काही राज्यात तिचे कमीअधिक ज्ञान असणारे नागरिक असले तरी एक राज्यभाषा ह्याहून अधिक मोठे स्थान तिला दिल्याने सर्वसामान्य भारतीयांच्या हिताचे दृष्टीने काय साधणार ? अखिल भारतीय क्षेत्रात बौद्धिक व व्यावहारिक देवघेवीसाठी कोणती तरी दुसरी भाषाच शिकायची तर ती हिंदी का ? मग इंग्रजीच शिकावी. भारतात अज्ञान आणि निरक्षरता फार मोठ्या प्रमाणवर आहे. शिक्षणाच्या कार्याला अजूनही कोऱ्या पाटीवर सुरुवात करायची आहे; अशीच जवळजवळ स्थिति आहे. विचारपूर्वक धोरण ठरवून कार्यक्रम आखायला अजूनही संधि आहे. तिचा आम्ही सूज्ञपणे उपयोग केला पाहिजे. आमचा नवा कार्यक्रम मातृभाषा आणि इंग्रजी ह्या दोन स्तंभावर उभारलेला असावा. आता मातृभाषा आणि इंग्रजी ह्याखेरीज तिसरी भाषा कोणत्याही भारतीयाने कधी शिकूच नये अशा ह्याचा अर्थ नाही. विशेष कारणासाठी कोणत्याही भारतीयाने कोणत्याही आणि कितीही भाषा शिकाव्यात. राजकीय वा अन्य कारणासाठी ज्याला हिंदी आणि इतर भारतीय भाषा शिकायच्या असतील त्याने त्या जरूर शिकाव्या. महात्मा गांधीचे चिटणीस महादेवभाई देसाई ह्यांना भारतातल्या सर्व भाषा येत. भारताच्या कानाकोपऱ्यांतून जनतासंपर्क करणाऱ्या त्या महापुरुषाच्या त्या चिटणीसाची ती खास गरज होती. विशेष कारणासाठी कुणी फ्रेंच, जर्मन, वगैरे युरोपीय भाषा, चिनी, जपानी, वगैरे आशियाई भाषा शिकतील. संस्कृत प्राकृत ग्रीक लॅटिन वगैरे प्राचीन भाषांचे अध्ययनही होईल. आपल्या वैयक्तिक गरजे-प्रमाणे आणि आवडीप्रमाणे कुणी किती व कोणत्या भाषा शिकाव्या ह्याबद्दल नियम घालण्याचे कारण नाही. मातृभाषा आणि इंग्रजी ह्यांचे ज्ञान प्रत्येकाचे बाबतीत अत्यावश्यक, सक्तीचे आणि बाकी सर्व ऐच्छिक अशी ही योजना असावी.

सुरुवातीस म्हटल्याप्रमाणे वस्तुतः ह्या भाषेच्या समस्येच्या संदर्भात राष्ट्रीयत्वाचा प्रश्नच उद्भवू नये. आणि अगदी राष्ट्रीय दृष्टीने जरी विचार केला तरी असे सांगता येईल की, एका राष्ट्राला एक राष्ट्रभाषा असलीच पाहिजे असे काही शास्त्र नाही. एक भाषा नाही म्हणून एकराष्ट्रीयत्व नाही, थोडेबहुत असेल तर ते टिकणार नाही, वाढणार नाही, असे काहीही नाही. राष्ट्रीयत्वाची भावना तितकीच तीव्र असेल तर ती एक राष्ट्रभाषा नसूनही कायम राहीलच. आणि ती तितकी तीव्र नसेल तर एक भाषा देऊनही काही होणार नाही. जेव्हा एखाद्या भाषेसंबंधीची भावना तीव्र असते आणि तीचीच राष्ट्रीयत्वाच्या भावनेत परिणती होते तेव्हाची गोष्ट निराळी. तिथे भाषाभिमान आणि राष्ट्रीयत्व एकच होतात. भारतातील परिस्थिति अगदी वेगळी आहे. इथे फार मोठ्या भागात हिंदीबद्दल आत्मीयता नाही, उलट हिंदी विरोधी भावना अतिशय तीव्र आहे. अशा परिस्थितीत त्या भाषेद्वारा राष्ट्रीयत्व निर्माण करण्याची गोष्ट बोलण्यात काय अर्थ आहे ? एकाद्या भाषेसंबंधीचे प्रेम एकाद्या राष्ट्रातील लोकांना आपण होऊन वाटले तर त्याला अर्थ आहे, प्रेम किंवा भावना अंतस्फूर्त असावी लागते. ती कोणावर लादता कशी येईल ? आम्ही तुम्हाला देशभक्त व्हायला भाग पाडू, हिंदीबद्द-लचा स्वाभिमान तुमच्यावर लादू, अशासारख्या भूमिका म्हणजे विलक्षण वदतो व्याघाताची उदाहरणे आहेत. भावनेची सक्ती होऊ शकत नाही. निष्कर्ष असा की, भारताच्या भाषिक प्रश्नाबाबत त्याचा भारतीय राष्ट्रीयत्वाशी संबंध न आणता विचार व्हावा. हिंदीसारख्या भाषेचे घोडे राष्ट्रीयत्वाच्या नावाने पुढे दामटले जाऊ नये. भारताचे राष्ट्रीयत्व हे हिंदीशिवाय आहे, आणि हिंदीशिवाय टिकू शकेल वाढू शकेल. उपयुक्ततावादी, व्यवहारी दृष्टिकोनातून हिंदीचा विचार करायला काहीच हरकत नाही, आणि तो करता त्या भाषेला राज्यभाषेहून अधिक स्थान देणे असमंजसपणाचे होईल हे वर काहीशा विस्ताराने पाहिलेच आहे.

तेव्हा भारतातील भाषाविषयक धोरण राज्यभाषा आणि इंग्रजी ह्या दोन आणि दोनच भाषांच्या अनुरोधाने आखणे हा एकच मार्ग सोयीचा आणि न्यायाचा दिसतो.







अनुक्रमणिका

श्री. मोहन रा. लिमये

# इंग्रजी शब्दोच्चारांचे देवनागरीत लेखन ( पूर्वार्ध )

## भूमिका

एखाद्या भाषेच्या आधुनिक पद्धतीच्या अध्यापनामध्ये त्यातील शब्दांचे शुद्ध उच्चार शिकविणे हे एक प्रधान अंग असले पाहिजे, ही गोष्ट सर्वमान्य झालेली आहे. ज्या भाषेचे लेखन उच्चारानुसारी नाही, म्हणजेच ज्या भाषेतील उच्चार त्यातील शब्दांच्या लेखनापासून दूर गेलेले आहेत, अशा भाषेतील उच्चार शिकविताना फारच सावधानता बाळगावी लागते. इंग्रजी ही अशा स्वरूपाची भाषा आहे. आधुनिक शब्दकोशांमध्ये शब्दोच्चार 'आंतरराष्ट्रीय उच्चारसंघटना' ( International Phonetic Association ) या संस्थेने मान्य केलेल्या लिपीमध्ये* दिले जातात. या लिपीमध्ये योजिलेल्या चिन्हांचे ( Symbols ) उच्चार ( acoustic values ) निश्चित केलेले असतात. शब्दांचे उच्चार या लिपीमध्ये देणे हीच खरी शास्त्रशुद्ध पद्धत होय. आवश्यक[1] ती चिन्हे व त्यांचे उच्चार विद्यार्थ्यांना समजावून दिल्यावर त्या भाषेतील कोणत्याही शब्दाचा उच्चार, या आंतरराष्ट्रीय उच्चार लिपीमध्ये दिला असता, त्यांना स्वतःलाच शब्दकोशात पाहता येतो. आधुनिक 'इंग्रजी–इंग्रजी' शब्दकोशांमध्ये दिलेले शब्दोच्चार अशा खास शिक्षण मिळालेल्या विद्यार्थ्यांना समजू शकतात. परंतु परकीय भाषा म्हणून इंग्रजी शिकणाऱ्या महाराष्ट्रातील माध्यमिक आणि विद्यापीठीय आजच्या कितीशा विद्यार्थ्यांना आं० उ० लिपी माहीत आहे, आणि किती विद्यार्थ्यांना ती शिकविली जाते, या प्रश्नाचे उत्तर 'हजारातील एखाद्यालासुद्धा नाही' असेच द्यावे लागेल. माझा असा अंदाज आहे की, सध्या ज्या पद्धतीने इंग्रजीचे अध्यापन शाळा-कॉलेजामधून चाललेले आहे त्या पद्धतीने येत्या पन्नास वर्षांतसुद्धा ही आंतरराष्ट्रीय उच्चारलिपी बहुसंख्य विद्यार्थ्यांना माहीत होणार नाही. एवढेच नव्हे तर असे आधुनिक 'इंग्रजी' उच्चारणकोश उपलब्ध आहेत हेही बऱ्याच शिक्षकांना व प्राध्यापकांना माहीत नसते. अशा परिस्थितीमध्ये 'इंग्रजी–मराठी' कोशांमध्ये सध्या अनुसरली जाणारी, देवनागरीत इंग्रजी शब्दोच्चार देण्याची पद्धती अपरिहार्य आहे हे उघड आहे. मागे सुचविल्याप्रमाणे ही पद्धत अशास्त्रीय व अपूर्ण आहे. तरीसुद्धा आंतरराष्ट्रीय उच्चारलिपी शिकविली जाईपर्यंत थांबता काही येणार नाही. त्यामुळे 'इं-म.' शब्दकोशांमध्ये इंग्रजी शब्दोच्चार देण्यासाठी देवनागरीचा वापर करणे अटळ ठरते.

या कार्यासाठी देवनागरी लिपीचा वापर डोळसपणे आणि पूर्ण अभ्यासांती केल्यास त्यापासून आज होणारे बरेचसे दुष्परिणाम टाळता येतील, आणि विद्यार्थ्यांच्या इंग्रजी शब्दोच्चारणामध्ये बरीच प्रगती दिसेल. पण 'इंग्रजी-मराठी' शब्दकोशकार व या विषयावर ज्यांनी लेखन केलेले आहे असे अन्य काही लोक यांनी देवनागरीचा या कामी केलेला वापर तपासून पाहिल्यास असे आढळून येते की शब्दकोशकार आणि अभ्यासक या नात्यांनी त्यांच्यावर असलेले दायित्व त्यानी नीट पार पाडलेले नाही, व एखादा आराखडाही तयार केलेला नाही.

## इंग्रजी शब्दांमधील स्वरोच्चारांचे ऱ्हस्वदीर्घत्व

मराठी व इंग्रजी या भाषांच्या उच्चारप्रक्रियामधील थोड्याशाच ठळक गोष्टी लक्षात घेतल्या तरी इंग्रजी शब्दांचे उच्चार देवनागरीत देताना केवढ्या अडचणी येतात हे ध्यानात येईल. मराठीमध्ये बोलताना स्वरांच्या ऱ्हस्वदीर्घत्वाची ओढाताण किंवा उलटापालट झाल्यामुळे शब्दांचे ( आणि त्यामुळे अर्थांचे ) घोटाळे होत नाहीत. [ Vowel length is not phonemic in Marathi. ]

* I. P. A. च्या खुणा नसल्याने दुसरी रोमन लिपीतील चिन्हे वापरली आहेत.

१. एका भाषेतील शब्दांचे उच्चार देताना आंतरराष्ट्रीय उच्चारलिपीमधील सर्व चिन्हांची अर्थातच गरज लागत नाही.



अनुक्रमणिका

उदा. 'पाणी,' 'भीती' इ० शब्दांमधील 'ई' हा स्वर ऱ्हस्व किंवा दीर्घ कसाही उच्चारिला तरी कोणता शब्द बोलला जात आहे हे समजते. पण तेच खाली दिलेल्या इंग्रजी शब्दांच्या जोड्या, त्यातील स्वरांच्या केवळ ऱ्हस्वदीर्घ या फरकामुळेच तयार झालेल्या आहेत हे दिसून येईल.

| | | |
|---|---|---|
| fill | आणि | feel |
| full | ,, | fool |
| it | ,, | eat |

म्हणूनच इंग्रजी शब्दांचा उच्चार देवनागरीत देताना त्यामधील स्वरांच्या ऱ्हस्वदीर्घत्वाकडे काटेकोर दृष्टीने पाहिले पाहिजे. ती काळजी उपलब्ध इं.– म. कोशांमध्ये सर्वत्र घेतलेली आढळत नाही.

उदा० श्री. के. भि. ढवळे यांनी प्रकाशित केलेल्या शब्दकोशात 'gesticulate' या क्रियापदाचा उच्चार / जेस्टिक्यलेट[2] / असा दिलेला आहे. या उच्चारातील इतर उणिवा बाजूस ठेवून फक्त प्रस्तुत मुद्याला पुष्टिदाखल तेवढ्याच उणिवेचा उल्लेख करतो. / क्यू / असा दीर्घ नको, /क्यु/ असा ऱ्हस्व हवा बारीक शोध घेतला तर अशी अनेक उदाहरणे सापडतील. वरील उदाहरणांमध्ये वस्तुतः बरोबर उच्चार देण्यास कोणतीच तांत्रिक अडचण नाही, कारण देवनागरीमध्ये दीर्घ व ऱ्हस्व असे दोन्ही प्रकारचे 'उ' आहेत. असलाच प्रकार सर्वश्री० किंकर आणि वैद्य यांच्या कोशात आढळतो. या कोशात 'glory' हा शब्द / ग्लोरी / असा आढळतो. यामध्ये दोन्ही स्वरोच्चार चुकीचे दिलेले आहेत. प्रस्तुत मुद्याच्या संदर्भात 'इ' ऱ्हस्व पाहिजे एवढे निदर्शनास आणून दिले म्हणजे पुरे. सबंध शब्दाच्या उच्चाराचे लेखन / 'ग्लॉ : रि / असे हवे.

## इंग्रजी व मराठी भाषांमधील स्वरोच्चार

इंग्रजीमध्ये खाली दिल्याप्रमाणे २० स्वरोच्चार आहेत. [ काहींच्या मते हा आकडा २१ आहे. हे भाषाशास्त्रज्ञ / ɔə / हा एक जास्त संयुक्तस्वर ( diphthong ) मानतात; पण याची जागा बहुसंख्य इंग्रजी- मातृभाषिकाच्या बोलण्यामध्ये / ɔ: / या स्वरोच्चाराने घेतली जात असल्याने त्याचा स्वतंत्र स्वरोच्चार ( Vowel phoneme ) म्हणून समावेश केला नाही तरी चालेल. ]

**शुद्धस्वर** ( monophthongs )

| | |
|---|---|
| (१) / i: / | (२) / i / |
| (३) / e / | (४) / æ / |
| (५) / a: / | (६) / ɔ / |
| (७) / ɔ: / | (८) / u / |
| (९) / u: / | (१०) / ʌ / |
| (११) / ə: / | (१२) / ə / |

**संयुक्त स्वर** ( diphthongs )

| | |
|---|---|
| (१३) / ei / | (१४) / ou / |
| (१५) / ai / | (१६) / au / |
| (१७) / ɔi / | (१८) / iə / |
| (१९) /ɛə/ | (२०) / uə / |

पण मराठीमध्ये मात्र स्वरदर्शक **अक्षरांची संख्या** दहा आहे. 'अॅ' व 'ऑ' ही आता रूढ झालेली अक्षरे ( व स्वरोच्चारसुद्धा ) म्हणून त्यांचा समावेश केल्यावर ही संख्या दोहोंनी वाढेल. ही स्वरदर्शक अक्षरे खालीलप्रमाणे–

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, अॅ आणि ऑ. केवळ स्वरोच्चारांचा विचार केल्यास, मराठीमध्ये स्वरांचे ऱ्हस्वदीर्घत्व ( Phonemic ) विशेष महत्त्वाचे नसल्याने, त्यांची संख्या दहा होईल. शिवाय हे सर्व स्वरोच्चार इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांना समान नसल्याने इंग्रजी शिकणाऱ्या मराठी–भाषिक विद्यार्थ्याला बरेचसे इंग्रजी स्वरोच्चार नव्याने शिकावे लागतील. अर्थात हा भाग ध्वनिलेखनात संभवत नसून तो ध्वनिनिर्मितीमध्ये उद्भवतो.

## इंग्रजी स्वरोच्चारांचे देवनागरीत लेखन

आता इंग्रजी-मराठी कोशांनी इंग्रजी स्वरोच्चारांचे देवनागरीत लेखन कसे केले आहे ते पाहू, व त्याचप्रमाणे या संदर्भात येणाऱ्या अडचणींचा परिहार कसा करता येईल ते पाहू. इंग्रजी स्वरोच्चारांच्या विचारास शेवटून सुरुवात करू या. शेवटच्या सहा ( संयुक्त ) स्वरोच्चारांचे देवनागरीत लेखन करताना

२. दोन तिरप्या समांतर रेषांचा उपयोग या रेषांमधील अक्षरांचा **उच्चारच** केवळ अभिप्रेत आहे हे दाखविण्यासाठी केलेला आहे. इंग्रजीमधील उच्चारलेखनासाठी या चिन्हाची फारच आवश्यकता भासते.

अडचण निर्माण होत नाही, कारण ते प्रत्येकी दोन शुद्ध स्वरांचे एकत्रीकरण समजता येते. आंतरराष्ट्रीय उच्चारलिपीमध्ये जशी चिन्हे वापरली आहेत त्यासदृश (Corresponding) चिन्हे देवनागरीत वापरायाची.

उदा० / ai / = आ इ, / iə / = इअ, /uə/ = उअ, / au / = आउ वगैरे.

/ ऐ / व / औ / हे मराठीतील उच्चार इंग्रजीमध्ये नसल्याने प्रि. सबनीस व प्रा. डोळे यांच्या 'साधना' शब्दकोशात / ai / व / au / याबद्दल वापरलेली वरील चिन्हे चुकीची आहे असे म्हटले पाहिजे. उदा. Cow हा शब्द / कौ / असा न लिहिता /काउ/ असाच लिहिला पाहिजे. त्याचप्रमाणे या कोशात preside[3] सारखे शब्द / प्रिसैड् / असे लिहिलेले आहेत. ते / प्रिझाइड / असे लिहिले पाहिजेत. आश्चर्याची गोष्ट अशी की याच 'साधना' कोशात why चा उच्चार मात्र / वाइ / असा दिलेला आहे. ही अक्षम्य विसंगती (inconsistency) आहे.

'नवे जग' मासिकामध्ये mountain हा शब्द / मौन्टिन् / असा लिहिलेला आढळला. त्याचे लेखन / माउन्टिन् / असे पाहिजे. [ पण मग fountain हा शब्द / फाउन्टिन् / असा का दिलेला आहे बरे ? तज्ज्ञ म्हणविणाऱ्यांनी अशा विसंगतीच्या दोषांना पात्र व्हावे ही दुर्दैवाची गोष्ट आहे. ]

इंग्रजीमधील १३ वा / ei / उच्चार हा संयुक्त स्वर आहे, म्हणजेच त्यामध्ये एका स्वराकडून दुसऱ्या घटकस्वराकडे जावे लागते. उलटपक्षी ह्या स्वरोच्चाराच्या देवनागरीलेखनासाठी ज्या अक्षराचा सामान्यतः उपयोग केला जातो ते 'ए' हे अक्षर भारतीय भाषांमधील शुद्ध स्वर (monophthong) दर्शविते. मराठी भाषिक विद्यार्थ्यांना त्यांचा /ए/ व हा इंग्रजी / ei / यांमधील ह्या फरकाची कल्पना द्यावयास पाहिजे. बहुतेक सर्व इं. म. कोशांमध्ये / e / व / ei / [ अनुक्रमे क्रमांक ३ व १३ ] हे दोन्ही स्वरोच्चार 'ए' या एकाच देवनागरी अक्षराने दाखविले जातात. ज्यांची मराठी ही मातृभाषा आहे असे लोक या दोन उच्चारांमधील भेद सामान्यपणे पहिला उच्चार ऱ्हस्व व दुसरा दीर्घ / ए / करून दाखवितात. हे उच्चारण जरी इंग्रजीतील वस्तुस्थिती दर्शविणारे नसले तरी आकलनसुलभ आहे. पण बहुतेक सर्व इं. म. कोशांमध्ये या फरकाची जाणीवसुद्धा दिसत नाही. उदा. श्री. कृ. भा. वीरकर, सर्वश्री. किंकर आणि वैद्य, प्रा. अधिकारी इत्यादींचे शब्दकोश. प्रि. सबनीस व डोळे यांना get व gate या दोन शब्दांमधील / ए / हे दोन वेगळे उच्चार आहेत याची जाणीव आहे; पण त्यांनी यामधून वाट काढण्याचा प्रयत्न केलेला नाही. सर्वश्री. लेले व किनरे यांनी आपल्या कोशात या दोन / ए / उच्चारांसाठी विशिष्ट चिन्हांची योजना केलेली आहे. परंतु हे दीर्घत्वदर्शक चिन्ह त्यांनी सातत्याने इतर तत्सम प्रसंगी वापरलेले नाही.

या ठिकाणी आंतरराष्ट्रीय उच्चारलिपीमध्ये वापरलेली, व त्यामुळे सार्वत्रिक आणि रूढ झालेली / : / ही खूण स्वरोच्चारांचे दीर्घत्व दर्शविण्यासाठी वापरणे योग्य होईल.

यानुसार, उदा० let हा शब्द / लेट् /
आणि late हा शब्द / लेःट् / असा लिहिता येईल. / ए / व /एः / या फरकाची जाणीव नसल्याची उदाहरणे उपरिनिर्दिष्ट कोशांमध्ये जशी सापडतात तशी 'नवे जग'[3] मधील लेखमालेतही सापडतात.

उदा० Macbeth / मक्बेथ् / मधील /ए/ हा ऱ्हस्व उच्चार इंग्रजी स्वरोच्चारक्रमांक ३ म्हणजेच / e / हा आहे.

आणि, examination /इग्झॅमिनेशन् / या शब्दामधील ए हा दीर्घ स्वर-उच्चार क्रमांक १३ म्हणजेच / ei / हा आहे.

पण दोहोंचे लेखन येथे सारखेच केलेले आहे. दुसऱ्या शब्दातील / ने / हा / नेः / असा लिहिला म्हणजे कोणता उच्चार अभिप्रेत आहे ते स्पष्ट होईल. [ वरील दोन्ही शब्दात प्रत्येकी एक याप्रमाणे आणखी दोष आहेत. ]

इंग्रजी स्वरोच्चार क्रमांक १४, / ou / हा मराठी / ओ / - प्रमाणे शुद्धस्वर नसून संयुक्त स्वर आहे; एवढे विद्यार्थ्यांना सांगणे आवश्यक आहे. [ जाणत्या

३. श्री. मा. का. देशपांडे यांनी 'नवे जग' मासिकाच्या जुलै ते सप्टेंबर १९६३ च्या अंकामध्ये 'तुम्हाला इंग्रजीचे खरे उच्चार येतात?' या नावाच्या तीन शब्दमाला लिहिल्या होत्या. त्यातील काही शब्दोच्चार.










शिक्षकास शक्य झाल्यास त्यानुसार आर्. पी-मधील (Received pronunciation) हा /ou/ उच्चार विद्यार्थ्यांकडून घटवून घेता येईल. ] पण त्यासाठी सध्या प्रचलित असलेले / ओ / हे देवनागरी चिन्ह बदलण्याचे कारण दिसत नाही. कमीत कमी चिन्हांचा वापर सुटसुटीतपणा आणतो, आणि त्यामुळे शिकविण्यामध्ये सुलभता येते. शुद्ध स्वर /ə/ हा इंग्रजी भाषेच्या प्रमाणभूत उच्चारामध्ये, [ ज्याचाच विचार आपण या लेखात करीत आहोत ], अतिशय कमी ( rare ) प्रमाणात वापरला जात असल्याने घोटाळा होण्याचा संभवच नाही.

येथवर इंग्रजीतील संयुक्त स्वरांचे देवनागरीत कसे लेखन करावयाचे याचा विचार झाला. आता शुद्ध स्वरांकडे वळू. ते वरपासून सुरू करू.

इंग्रजी स्वरोच्चार क्रमांक एक व दोन म्हणजे /i : / व / i / यांच्यासाठी अनुक्रमे ' ई ' व 'इ' अक्षरे देवनागरीत आहेतच. त्याचप्रमाणे क्रमांक ३ ( म्हणजेच / e / हा ) ' ए ' या अक्षराने, आणि क्रमांक ४. म्हणजेच / æ /, हा स्वरोच्चार आता मराठी लेखनात रूढ झालेल्या ' ॲ ' या अक्षराने असे दाखविता येतील.

पांचवा इंग्रजी स्वरोच्चार / a : / हा एक दीर्घ उच्चार आहे. मराठीमधील /आ/ ची लांबी स्वराच्या एखाद्या शब्दामधील स्थानावर अवलंबून आहे. त्यामुळे ' फार ' सारख्या शब्दाच्या उच्चारात / आ / बराच दीर्घ आहे हे खरे. परंतु इंग्रजीमधील / a : / शी तुलना करता मराठीतील / आ / बहुसंख्य वेळी ( in a large number of phonetic contexts ) ऱ्हस्व असतो, म्हणून इंग्रजी / a : / चे देवनागरीत लेखन करताना दीर्घत्वनिदर्शक / : / या द्विबिंदुयुक्त चिन्हाचा वापर करावा, असे मला आग्रहाने सुचवावेसे वाटते. म्हणजे मराठीभाषिक विद्यार्थी car, star, asked यांच्यासारख्या शब्दांमधील /a:/ या स्वरोच्चाराचा उच्चार पुरेसा दीर्घ ( इंग्रजीमध्ये जेवढा दीर्घ आहे तेवढा ) करतील. स्वानुभवाने मी असे म्हणू शकतो की बहुसंख्य मराठी विद्यार्थी वरील शब्दांमधील / आ / पुरेसा दीर्घ उच्चारीत नाहीत. Car चे / काः / हे देवनागरी लेखन त्या दृष्टीने फायद्याचे ठरेल.

सध्या उपलब्ध असलेल्या कोणत्याही इं.–म. शब्दकोशात या बाबीचा गंभीरपणे विचार झालेला नाही. सर्व कोशकारांनी देवनागरीतील ' आ ' या अक्षरावरच भागविलेले आहे. या संदर्भात वर उल्लेखिलेल्या लेखमालेमध्ये[3] आणखी एक विसंगतीचे उदाहरण आढळते. त्यामध्ये asked हा शब्द /आ—› स्ट्[4] / असा बरोबर दिलेला आहे; पण 'Carpenter या शब्दाच्या पहिल्या अवयवातील स्वरोच्चार वरच्या शब्दातल्याप्रमाणेच असताना त्याचे लेखन मात्र /कापिन्ट/ असे केलेले आहे. हा शब्द /का —› पिन्ट / असा देणे सुसंगत झाले असते. [ जाता जाता एवढे नमूद करावेसे वाटते की —› बाण या चिन्हाच्या जागी I. P. A. च्या मान्यतेमुळे सार्वत्रिक झालेले, स्वरोच्चारांचे दीर्घत्व दर्शविणारे द्विबिंदुचिन्ह वापरणे नैसर्गिक झाले असते. ]

इंग्रजी स्वरोच्चार क्रमांक ६ व ७ यांच्याबद्दल देवनागरीत अनुक्रमे / ऑ / व / ऑः / ही अक्षरे वापरता येतील. ' साधना ' कोशकारांना या दोन स्वरोच्चारांमधील फरकाची जाणीव आहे; पण त्यांनी हा फरक दर्शविण्यासाठी, म्हणजेच क्र. ७. / ɔ : / हा स्वरोच्चार असलेल्या इंग्रजी शब्दांचा उच्चार देवनागरीत लिहिताना, कोणत्याच चिन्हाचा वापर केलेला नाही. साधना शब्दकोशात दिलेले tall / टॉल् /, story /स्टॉ'रि/ हे शब्द / टॉः ल् / व / 'स्टॉ : रि / असे लिहावेत. दीर्घत्वनिदर्शक म्हणून द्विबिंदुचिन्ह / : / वापरावे ही माझी शिफारस असल्याने, मी cot हा शब्द / कॉट् / व caught हा शब्द / कॉःट् / असेच लिहावेत असे सुचवीन. इंग्रजी स्वरोच्चार /ɔ/ व / ɔ : / ह्यांच्यामध्ये पहिला ऱ्हस्व व दुसरा दीर्घ एवढाच फक्त फरक आहे असे मला म्हणावयाचे नाही. / ɔ : / च्या उच्चारात ओठ जास्त गोलाकार ( lip-rounding ) होतात. त्यामुळे तोंडाच्या आतील भागाच्या ( resonating chamber ) आकारमानात बदल होतो हे मान्य. तरी सुद्धा / e / व /ei / – क्रमांक ३ आणि १३ – यांचे देवनागरीत लेखन करताना जे तत्त्व वापरले त्यांचाच वापर

४. या लेखमालेत —› स्वराचे दीर्घत्व दाखवितो.



अनुक्रमणिका

सोय आणि सुसंगतता यासाठी परत येथेही केलेला आहे. सर्वत्र उच्चार हे ऐकणाऱ्यास आकलन -सुलभ ( minimum intelligibility ) व्हावेत हे ध्येय पुढे ठेवून शब्दकोशरचनेमध्ये जेवढी शास्त्र-शुद्धता व पूर्णता सुचविता येईल तेवढी सुचविण्याचा येथे प्रयत्न केलेला आहे. ध्वनिलेखन कितीही निर्दोष केले गेले तरी उच्चारणप्रक्रिया तज्ज्ञ शिक्षकाने शिकविण्याची, म्हणजेच स्वतः उच्चार तोंडातून काढण्याची व विद्यार्थ्यांकडून वदवून घेण्याची, आवश्य-कता कायम राहिलच. केवळ उपरिनिर्दिष्ट कोशामध्ये या फरकाची जाणीव दिसली. इतर सर्व इं. – म० कोशांमध्ये ही जाणीवसुद्धा दिसत नाही, मग त्यासाठी उपाय योजना होणे दूरच राहिले.

इंग्रजी स्वरोच्चार / u / व / u: / (क्र० ८ आणि ९ ) यांच्याबद्दल आज सर्वत्र अनुक्रमे ' उ ' व ' ऊ ' ही चिन्हे वापरात आहेतच. त्याबाबत कोणती अडचण नाही.

आता मराठी /अ/ या स्वराशी जवळीक असलेल्या तीन शुद्ध स्वरोच्चारांचा म्हणजे / ʌ / , / ə: / आणि / ə / यांचा विचार करू या. बहुतेक सर्व इं. – म. कोशांमध्ये या तिन्ही उच्चारांबद्दल मराठीतील ' अ ' हेच अक्षर वापरलेले आढळते. वास्तविक इंग्रजी स्वरोच्चार क्रमांक १२, म्हणजेच / ə /, हा फक्त एकच उच्चार मराठी / अ / सारखा आहे. तेव्हा त्याच्याबद्दल ' अ ' हे देवनागरी अक्षर वापरावयास हरकत नाही. क्रमांक ११ म्हणजे / ə: / हा दीर्घ / अ / असल्याने / अः / या चिन्हाने तो देवनागरीमध्ये दाखविता येईल. फक्त प्रि. सबनीस व डोळे यांच्या ' साधना ' शब्दकोशात या क्र. ११ स्वरोच्चाराबद्दल दीर्घ / अ / हे चिन्ह / अऽ / असे वापरलेले आहे. बाकी सर्व शब्दकोश चाळणाऱ्या विद्यार्थ्याला कोणत्या शब्दांत / अ / ऱ्हस्व व कोणत्यामध्ये दीर्घ म्हणावयाचा हे, स्वतंत्र चिन्हाभावी, समजणे अशक्य आहे.

वरील त्रिकुटातील क्र. १० म्हणजेच / ʌ / हा इंग्रजी स्वरोच्चार मराठी / अ / पेक्षा जास्त खुला ( open ) ध्वनी आहे. पण ह्या त्याच्या वेगळेपणाची ( distinguishing feature ) जाणीव मी पाहि-लेल्या कोणत्याही इं.– म. शब्दकोशात आढळली नाही; मग त्यासाठी स्वतंत्र चिन्हाचा वापर केला गेलेला असेल ही आशा करण्यात अर्थ नाही. अशा परिस्थितीमध्ये ' cut ' या शब्दामधील अधोरेखित स्वरोच्चार व ' again ' या शब्दामधील अधोरेखित स्वरोच्चार हे भिन्न आहेत असे विद्यार्थ्यांना समजावे कसे ? उच्चाराबाबत जास्त काळजी घेऊन रचलेल्या ' साधना ' कोशातही हा गोंधळ दिसतो. इतर सर्व शब्दकोशांमध्ये तर आहेच. ' Mud ' या शब्दाच्या उच्चाराचे देवनागरी रुपांतर / मड् / असेच, व 'afraid' या शब्दोच्चाराचे रूपांतरही / अफ्रे'ड/ असेच या दोन / अ / उच्चारांमधील फरक जाणते शिक्षक लाभले तरच विद्यार्थ्यांना समजणार; पण इं.–म. शब्दकोशांना यामध्ये मार्गदर्शकाची भूमिका नसणार. ' Mud ' सारख्या शब्दामधील हा स्वरोच्चार / मड् / असा [ अ ] अधोरेखित ' अधिक ' चिन्हाने दाख-वावा असे मी सुचवीन.[५]

### व्यंजनोच्चार – विचार

इंग्रजी व्यंजनोच्चारांचा तक्ता खाली देत आहे.

स्फोटक (plosive) : / p /, / b /; / t /, / d /, : k /, / g /

घर्षक (fricative) : / f /, / v /, / q /, / Q /, / s /, / z /, / r /, / S /, / Z /; / h /

अर्धस्फोटक किंवा स्फोटक–घर्षक ( affricate ) : / C /, / j /,

अनुनासिक ( nasal ) : / m /, / n, / ŋ /

५. या लेखात सर्वत्र अधोरेखित अधिक + ही खूण, एखाद्या देवनागरी अक्षराचा रूढ उच्चाराहून वेगळा ध्वनी इंग्रजीत अपेक्षित आहे, एवढेच फक्त सुचविण्यासाठी मी केलेला आहे. / + / या चिन्हाला स्वतःचा असा उच्चार ( inherent acoustic value ) नाही. देवनागरीत इंग्रजी शब्दांचा उच्चार वाचणाऱ्याला सावध करणे एवढेच या चिन्हाचे कार्य.








ल वर्ण ( lateral ) : /l/
अर्धस्वर ( semi-vowels ) : /w/, /y/

इंग्रजी स्फोटक वर्ण मराठीतल्याप्रमाणेच साधले जात असल्यामुळे त्यांचे देवनागरीत लेखन करण्यात अडचण नाही. ते अनुक्रमे प्, ब्; ट्, ड्; क् व ग् असे लिहिता येतात त्याचप्रमाणे इंग्रजी व्यंजनोच्चार /r/ आणि /l/; /s/ व /S/; /h/ आणि अनुनासिके /m/, /n/ व /ṇ/ हे सर्व उच्चार देवनागरीत अनुक्रमे र्, ल्; स्, श्, ह्, म्, न्, ङ्, याप्रमाणे लिहिता येतात. खरे पाहता, इंग्रजीमध्ये दोन /ल्/ आहेत; पण त्यांच्यातील फरकामुळे शब्दभेद उत्पन्न होत नाहीत. (The difference is allophonic.) /y/ आणि /w/ हे अर्धस्वर /य्/ आणि /व्/ असे लिहिता येतील. [एकदा इंग्रजी /w/ या ध्वनीसाठी /व्/ हे चिन्ह वापरावयाचे ठरविले की, /v/ या व्यंजनोच्चाराबद्दल परत /व्/ हे चिन्ह वापरता येणार नाही, कारण इंग्रजी ध्वनी /w/ आणि /v/ हे मूलतः भिन्न आहेत.] इंग्रजी /w/ या वर्णाचा उच्चार करताना दोन्ही ओठ गोलाकार होऊन पुढे सरकतात ( vigorous lip-rounding ), या गोष्टीचा उल्लेख कोशकाराने आपल्या प्रस्तावनेत इंग्रजीच्या उच्चारप्रक्रियेचे विवेचन करताना केला पाहिजे. पण अशा स्वरूपाचा निर्देश कोणत्याही इं.–म. कोशामध्ये आढळत नाही.

## इंग्रजी घर्षक व्यंजनोच्चार

इंग्रजी घर्षक वर्णांना देवनागरी रूप देताना खऱ्या अडचणी निर्माण होतात. /f/ आणि /v/ ही इंग्रजीतील घर्षक व्यंजने देवनागरीत सर्वसाधारणपणे /फ्/ व /व्ह्/ या अक्षरांनी दाखविली जातात. भारतीय भाषामध्ये /फ्/ हा स्फोटवर्ण आहे. तो /f/ या इंग्रजी ओष्ठ्यदन्त्य घर्षकासाठी ( labio-dental fricative ) वापरणें योग्य नाही. परंतु संपूर्णतया वेगळेच चिन्ह वापरण्याऐवजी /फ्/ खाली /+/ अशी खूण केल्यास, बहुतेक भारतीय भाषांमध्ये रूढ असलेल्या उच्चारापेक्षा या नवीन वर्णाचा उच्चार काही वेगळ्या पद्धतीने होतो, याची जाणीव विद्यार्थ्याला सतत राहील. इंग्रजी वर्ण प्रत्यक्ष कसा बनतो याचे वर्णन कोशकाराने करावयासच पाहिजे. विद्यार्थ्यांच्या मातृभाषेत एखादा ध्वनी नसेल तर नुसत्या चिन्हावरून तो कसा उच्चारावयाचा ह्याचा त्याला बोध होणार नाही. संपूर्णपणे वेगळ्या चिन्हांचा वापर करू नये, कारण चिन्हांची संख्या निष्कारण वाढली तर विवेचनात क्लिष्टता येते. ती शक्यतो टाळली पाहिजे.

/v/ हा इंग्रजी वर्ण /व्+ह्/ असा नसल्याने तो /व्ह्/ याप्रमाणे दाखविणे म्हणजे चुकीचा उच्चार शिकविणे होय. /v/ वर्ण इंग्रजी /f/ सारखाच, पण फक्त सकंप ( voiced ), आहे. तो /व्/ याप्रमाणे
+
देवनागरीत लिहावा, म्हणजे /w/ साठी /व्/ आणि /v/ वर्णासाठी /व्/ असे लेखन निश्चित होईल. /v/
+
आणि /w/ या ध्वनीमधील फरकाची जाणीव अनेक अभ्यासकांना दिसत नाही. उदा० women हा शब्द /विमिन्/ असा लिहिल्यावर village हा शब्द /विलिज्/ किंवा vineyard हा शब्द /विन्यड्/ असे देता येणार नाहीत. ह्या शब्दमालेत अशा चुका वारंवार आढळतात. एका ठिकाणी 'provide' हे क्रियापद /प्रव्हाइड्/ असे व village हाच शब्द /व्हिलिज/ असे दिलेले आढळतात. ह्या लेखमालेत सुसंगती व जबाबदारपणा या गुणांचा पूर्णांशाने अभाव दिसतो.[६]

६. जाता जाता या शब्दमालेतील आणखी दोन गंभीर दोषांचा उल्लेख करणे आवश्यक आहे असे वाटते. जे शब्द उच्चार देण्यासाठी निवडण्यात आलेले आहेत त्यांच्या निवडीमागे कोणते तत्त्व आहे ? काही तत्त्व असावे असे वाटत नाही. जे शब्द निवडावयाचे ते भाषेचा वापर करणाऱ्यास उपयुक्त असावेत; आणि भाषेमध्ये काही शब्द किती वेळा पुन्हा पुन्हा येतात यावर त्याची उपयुक्तता ठरवावयाची असते ( utility being determined by frequency of occurrence ). समोर जो वाचकवर्ग अपेक्षित आहे त्याच्या गरजेनुसार शब्दांची निवड केली जावी. हे सर्वसामान्य शैक्षणिक तत्व येथे पाळलेले दिसत नाही. [ the selection of words seems to be random and haphazard. ] उदा० या यादीतील—



अनुक्रमणिका







/ w / आणि / v / या वर्णांच्या वास्तविक उच्चाराबद्दलचा हा गोंधळ बहुतेक सर्व शब्दकोशांमध्ये आढळतो. वीरकर, रानडे, प्रि. सबनीस व डोळे, किंकर व वैद्य इत्यादि सर्वांच्या कोशांमध्ये ही चूक दिसून येते.

इंग्रजी वर्ण / q / आणि / Q / हे दोन्ही घर्षक व्यंजनोच्चार असून ते सर्व इं. म. कोशांमध्ये अनुक्रमे /थ् / व /द्/ या देवनागरी अक्षरांनी दाखविले जातात. जे विवेचन / f / आणि /v/ या वर्णांच्या विवेचनात केले ते या दोन्ही वर्णांना हुबेहुब लागू पडते. दोन्ही वर्णांच्या उच्चारप्रक्रियेचे संक्षेपाने वर्णन करून त्यांच्यासाठी / थ / व / / द् / या चिन्हांचा वापर करणे इष्ट
+ +
होईल असे वाटते. इंग्रजी / q / हा वर्ण मराठीतील /स् / या ध्वनीला खूपच जवळ आहे असे सांगितल्यास विद्यार्थी हा इंग्रजी वर्ण विनासायास उच्चारु शकतात असा अनुभव आहे. [ इंग्रजी / q / वर्णाबद्दल / थ् /
+
ऐवजी । स् । हेच चिन्ह वापरावे अशी सूचना मांडण्याचा मोह होतो. पण ही सूचना अत्यंत फायद्याची ठरते असे प्रत्यक्ष प्रयोग करून आणि निरनिराळ्या पातळीवरील विद्यार्थ्यांचा प्रतिसाद ( response ) अजमावून निश्चित केले गेले पाहिजे. एका अमेरिकन तज्ज्ञाने याबाबतीत मला सांगितलेला अनुभव येथे नमूद करणे उचित होईल. ते म्हणाले की आपली मुलगी ८–९ वर्षांची होईपर्यंत / q व / s / हे दोन्ही वर्ण सारखेच उच्चारीत असे; आणि तिचे उच्चारण अपवादात्मक होते अशातील भाग नाही. तरीसुद्धा तिला कोणता वर्ण अभिप्रेत असे हे समजण्यास अडचण पडत नसे.

### इंग्रजीमधील अर्धस्फोटक व्यंजनोच्चार

/ C / व / J / या इंग्रजीमधील अर्धस्फोटकांचा विचार आधी करू. या वर्णांबद्दल देवनागरीतील अनुक्रमे / च् / व / ज् / हे वर्ण वापरावेत. सर्व शब्दकोशांमध्येहि याच चिन्हांचा वापर केला जातो. मात्र इंग्रजी / C / या चिन्हाने दर्शविलेला ध्वनी मराठीतील ' चहा ' या शब्दामधील / च् / या ध्वनीप्रमाणे आहे, आणि ' चमचा, ' ' चोर ' इत्यादि शब्दामधील / च् / सारखा नाही हे सांगितले पाहिजे. [ ' चोर ' सारख्या शब्दामधील / च् / = / ts / हा ध्वनी इंग्रजीमध्ये फारच क्वचित् वापरला जातो. ' cats ' सारख्या शब्दामधील ' ts ' या व्यंजनगुच्छाचा उच्चार काही इंग्रजीभाषिक ' चोर ' मधील ' / च् / प्रमाणे करतात. परंतु इतक्या rare उच्चाराचा उल्लेख प्राथमिक पातळीवरील उच्चार विवेचनात करण्याचे कारण नाही ].

इंग्रजी / $J_z$/ हा वर्ण ' joy, ' ' jar, ' 'James' इत्यादि शब्दामधील पहिल्या व्यंजनाक्षराचा उच्चार आहे. याबद्दल / ज् / या देवनागरी वर्णाचा उपयोग करण्याचे निश्चित केले की, हे प्रथमच सुस्पष्ट केले पाहिजे की, येथे ' जहाज ' मधील / ज् / अपेक्षित नसून ' जेवण' या शब्दामधील / ज् / अपेक्षित आहे.

Madonna / म डॉन / हा शब्द शाळाकॉलेजच्या सर्वसामान्य विद्यार्थ्याला माहित नसतो व माहित करून घेण्याइतक्या महत्त्वाचा तो नाही सुद्धा. हीच परिस्थिती Annihilate, half-penny वगैरे या यादीतील शब्दासंबंधीची आहे.

आता दुसऱ्या दोषासंबंधाने थोडेसे—

इंग्रजी–भाषिक लोकांमध्ये त्या भाषेच्या अनेक उच्चारपद्धती अस्तित्वात आहेत. अमेरिकन् , ऑस्ट्रेलिअन् , कनेडिअन् व खुद्द इंग्लंडमध्ये स्कॉटिश, लंडनमधील सामान्य लोकांची बोली ( London cockney ) लंडन, ऑक्सफर्ड् या शहरांच्या परिसरात बोलली जाणारी सुशिक्षित इंग्रजांची बोली–ज्यामधील उच्चारालाच ' Received pronunciation ' असे नाव दिलेले आहे, इत्यादि अनेक उच्चार प्रकार संभवतात. आपण यातील कोणता उच्चार प्रकार देवनागरीत लेखन करण्यासाठी स्वीकारलेला आहे हे लेखकाने सुस्पष्ट करणे आवश्यक आहे. तसा उल्लेख ' नवे जग ' मधील या शब्दमालेत कोठेहि केलेला नाही. अशा उल्लेखाच्या अभावी वाचक व टीकाकार यांना आपण कोणता उच्चारप्रकार वाचीत आहोत हे समजावे कसे ? शंका आली असता कोणता उच्चारप्रकार देणाऱ्या कोशाकडे त्यानी धाव घ्यावी ?










मराठी भाषिक व्यक्तीला मराठी भाषेतील लेखन वाचताना ही अडचण भासत नाही हे खरे; पण परकीय भाषेतील उच्चारांचे देवनागरीतील लेखन वाचताना ही अस्पष्टता ( ambiguity ) त्याला घोटाळ्यात पाडील.

**दोन घर्षक ध्वनी / z / आणि / Z /**

इंग्रजीमधील / z / या सकंप घर्षक व्यंजनवर्णाबद्दल /ज़्/ हे देवनागरी चिन्ह वापरावे असे वाटते, 'अधिक' + / + / चिन्हाचा वापर करणे येथे आवश्यक झालेले आहे. कारण / dj / या इंग्रजी ध्वनीसाठी आपण आताच / ज़् / या चिन्हाचा वापर करण्याचे निश्चित केले. / z / या ध्वनीबाबत महाराष्ट्रामध्ये सर्वत्र जो गोंधळ आढळतो तो केवळ अतर्क्य आहे. या गोंधळाचा एक भाग म्हणजे / z / बद्दल देवनागरी / झ् / नको, कारण मराठी किंवा अन्य भारतीय भाषांमध्ये /झ् / हा वर्ण म्हणजे /ज़् + ह् / असा संयुक्त व्यंजनोच्चार आहे. इंग्रजीमध्ये सकंप वर्ण कधीही ' ह ' कारयुक्त नसतात. ( Voiced sounds are not aspirated in English ].

या गोंधळाचा दुसरा भाग म्हणजे सयुक्तिक कारणाशिवाय ( indiscriminately ) या इंग्रजी वर्णाबद्दल दोन वेगळी / ज़् / व / झ् / अशी देवनागरी चिन्हे वापरणे हा होय. (industries, use (क्रियापद ), brothers वगैरे शब्दांमधील शेवटला ध्वनी आणि zoo, zero वगैरे शब्दातील पहिला ध्वनी हे एकच म्हणजे / z / असताना त्यांच्याबद्दल अनुक्रमे / ज़् / व / झ् / अशा दोन वेगळ्या चिन्हांचा वापर का केला जातो ते समजत नाही. अनेक रंगविलेल्या पाट्या किंवा जाहिराती यामध्ये हे शब्द / इंडस्ट्रिज़् / व / झ् / अशा प्रकारे लिहिलेले आढळतात. असे लेखन परस्परविसंगत व अशास्त्रीय आहे.

आता एकच शेवटचा इंग्रजी वर्ण राहिला; तो म्हणजे सकंप घर्षक व्यंजनोच्चार / Z / हा होय. आतापर्यंत माझ्या योजनेत [scheme of symbols] न वापरलेली / झ् / ही खूण या इंग्रजी वर्णासाठी वापरता येईल. मराठीतील हा वर्ण [ 'झेंडा' या शब्दातील पहिला व्यंजनोच्चार ] वास्तविक अर्धस्फोटक ( affricate ) ध्वनी आहे, आणि इंग्रजी / Z / हा घर्षक व्यंजनोच्चार ( fricative consonant ) आहे. तरीसुद्धा, एवढा फरक स्पष्ट केल्यावर या देवनागरी चिन्हाचा वापर करणे खूपच सोयीचे ठरेल असे वाटते. आज सर्व इं. – म. शब्दकोशांमध्ये / dj / व / Z / दोन्ही वर्णांबद्दल / ज़् / हे एकच चिन्ह वापरलेले आढळते उदा० ' join ' हा शब्द /जॉईन् / असा व 'decison '[७] हा / डिसि ' जन् / याप्रमाणे उच्चार दिलेले आहेत. हे उच्चार वस्तुतः दोन भिन्न ध्वनी आहेत हे आताच स्पष्ट केलेले आहे. decision हा शब्द / डि ' सिझन् / असा लिहिला पाहिजे.

प्रस्तुत लेखातील विवेचनात इंग्रजी शब्दांचे उच्चार देवनागरीत देताना कोणत्या स्वरूपाच्या अडचणी येतात ह्यांचे विवेचन मी केलेले आहे, आणि त्याचबरोबर काही उपायहि सुचविले आहेत. उपलब्ध इं.-म. शब्दकोश व या विषयावरील अन्य लिखाण या दोहोंमध्ये या अडचणींचे निराकरण झालेले नाही; एवढेच नव्हे तर या दोन प्रकारच्या लेखनांत इंग्रजी शब्दोच्चारांच्या आणखी इतरहि प्रकारच्या ( commission and omission या स्वरूपाच्या ) अनेक चुका आढळतात. उदा० एका स्वराच्या जागी दुसरा स्वर देणे, आघात किंवा जोर ( stress ) नको त्या अवयवावर देणे किंवा अजिबातच न देणे, चुकीचा व्यंजनोच्चार देणे किंवा उच्चारामध्ये नसलेले व्यंजन देणे, उपआघात ( partial stresses ) न दाखविणे, संभाषणात्मक अगर दररोजच्या इंग्रजीमध्ये शब्दांची जी रूपे वापरतात ( weak forms of structural words) त्यांचे उच्चार देण्याचे टाळणे इत्यादि० अशा प्रकारच्या चुकांचा परामर्श या लेखात मी घेतलेला नाही. [ या सर्व बाबी शब्दांच्या उच्चार प्रक्रियेत येतात. ] या चुकांच्या चर्चेसाठी आणखी एखाद्या स्वतंत्र लेखाची गरज आहे.

७. ' साधना ' शब्दकोश.



अनुक्रमणिका








श्री. माधव देशपांडे

# अलंकार : एक अभ्यास ( उत्तरार्ध )

## ६. अलंकार व विभ्रम

अलंकार काव्यात जितके उपरे वाटतात तितके ते नाहीत हेच मत प्रा. रा. श्री. जोग यांनी त्यांच्या विभ्रम कल्पनेद्वारा व्यक्त केले आहे. त्यांचा मूळ आक्षेप ' हारादिवद् अलङ्काराः ' या वचनावर आहे. हार किंवा दागिने हे मानवी शरीराच्या मानाने फारच उपरे वाटतात. शिवाय दागिने व शरीर याचे उपादानकारण एक नसते. त्यामुळे ' अलङ्काराः हारादिवत् ' असे न म्हणता " अलङ्कारा विभ्रमादिवत् " असे म्हणावे असे त्यांचे मत आहे.

" हारादिवत् " या दाखल्यातून अलंकार हे काव्य-स्वरूपाच्या बाहेरचे उपरे आहेत असा अर्थ दिसून येतो असा अभिप्राय संस्कृत साहित्यशास्त्रातही काहींनी व्यक्त केला आहे. जयदेवाच्या चन्द्रालोक या साहित्यग्रन्थावरील ' राकागम ' नावाच्या टीकेत असा उल्लेख दिसून येतो : " हारादिवद् इति अनेन काव्यस्वरूपबहिर्भाव उक्तः । " त्याचप्रमाणे हार व दागिने शरीरापासून वेगळे करता येतात पण काव्यातले अलंकार काव्यस्वरूपापासून वेगळे करता येत नाहीत. गुण जसे काव्यापासून अविभाज्य आहेत तसेच अलंकारही अविभाज्य आहेत. त्यांची प्रतीती केवळ निराळी असेल. जेव्हा अलंकार-ग्रंथांत अलंकारांचे विवेचन केले जाते तेव्हा केवळ विश्लेषणासाठी अलंकारांचा निराळा विचार केला जातो याचा अर्थ असा होत नाही की अलंकार काव्यापासून वेगळे काढता येतात. याच आशयाने वक्रोक्तिजीवितकार सांगतो—

" अलङ्कृतिरलङ्कार्यमपोद्धृत्य विवेच्यते ।
तदुपायतया तत्त्वं सालङ्कारस्य काव्यता ।। "

या श्लोकाचे स्पष्टीकरण कुंतकाने मोठ्या अर्थगर्भ रीतीने केले आहे- " सालङ्कारस्य अलङ्करण-सहितस्य निरस्तावयवस्य सतः समुदायस्य काव्यता । तेन अलङ्कृतस्य काव्यमिति स्थितिः न पुनः काव्यस्य अलङ्कारयोगः । " अलंकारांनी युक्त असलेल्यालाच काव्य म्हटले जाते. काव्य निराळे आणि त्याला अलंकार जोडले जातात अशी स्थिती नसते. त्यामुळे " हारादिवद् अलङ्काराः " असे न म्हणता " विभ्रमादिवद् अलङ्काराः " असे म्हणावे.

त्यांच्या मतातील आक्षेपार्ह म्हणून दाखविला गेलेला भाग वाटतो तो एवढाच की जसे अलंकारांचे उपादान-कारण शरीर नसते तसे विभ्रमांचे देखील उपादान-कारण शरीर असत नाही. विभ्रम हे शरीरावयवांच्या विशिष्ट अशा संयोगवियोगातून निर्माण होतात. परंतु हा एक क्षुल्लक आक्षेप बाजूला ठेवूनही प्रा. जोगांच्या मताचे समर्थन करणे सर्वथा शक्य आहे. श्री. जोग म्हणतात ––

"विभ्रम म्हणजे शरीरावयवांची रम्य अशी कोणतीही हालचाल. तिथे सहजता असावी कृत्रिमता नसावी. या विभ्रमांनी व्यक्तिसौंदर्यात भर पडते. परंतु मनुष्य जेव्हा निजावस्थेत असेल त्या वेळेस हे विभ्रम त्याच्या शरीरावर दिसणार नाहीत, हे त्यांचे स्थिर असे धर्म नाहीत. त्याप्रमाणेच अलंकार शोभा वाढवितात व अस्थिर आहेत म्हणून त्यांना विभ्रम म्हणावे. "

या अभिप्रायाचे माझ्या दृष्टीने समाधान-कारक स्पष्टीकरण अशा प्रकारे करता येईल. शरीर हे विभ्रमांचे उपादान कारण जरी नसले तरी शरीरावयवांची विशिष्ट संयोगवियोगरूप हालचाल ही विभ्रमांचे कारण आहे. तसेच अलंकार म्हणजे शब्दार्थ नव्हेत. शब्दार्थ हे त्यांचे उपादानकारणही नाहीत तर शब्दार्थांचे विशिष्ट संयोग-वियोग हेच या अलंकारांचे प्रधान कारण आहेत. अर्थाच्या ठिकाणी असलेल्या उपचारवक्रतेमुळे आणि शब्दाच्या ठिकाणी असलेल्या शब्दवक्रतेमुळे अलंकार निर्माण होतात असे कुंतकाने म्हटले आहे. ही वक्रता म्हणजे विशिष्ट संयोगवियोगच आहेत असे म्हणता येईल. सरस्वतीकंठाभरणात शब्दालंकारांविषयी म्हटले आहे–

" ये व्युत्पत्त्यादिना शब्दमलङ्कर्तुमिह क्षमाः ।
शब्दालङ्कारास्ते ……………… ।। "

या श्लोकांतील " **व्युत्पत्ति** " हा शब्द फार महत्त्वाचा आहे. या शब्दाचा अर्थ टीकाकारांनी असा केला आहे- " विशिष्टा उत्पत्तिः व्युत्पत्तिः । लोपागम-विकारादिप्रपञ्चः । " या इथे सांगितलेली ही **लोप-आगम-विकार** अशा प्रकारची व्युत्पत्ती देखील शब्दांचे संयोगवियोगच आहेत. तसेच या व्युत्पत्तीचा अर्थाशी अन्वय घालणे फारसे कठीण नाही. अशा रीतीने विभ्रम व अलंकार या दोहोंची उत्पत्ती शरीरावयव व शब्दार्थ



अनुक्रमणिका







यांच्या विशिष्ट संयोगवियोगातून होते. शरीर व दागिने यांप्रमाणे अलंकार व काव्यशरीर यांचे विभाज्यत्व नाही; तर विभ्रम जसे शरीरापासून अविभाज्य व निकट-संबंधी आहेत तसे अलंकार हे देखील काव्यशरीरापासून अविभाज्य व निकटसंबंधी आहेत. त्यामुळे अलंकारांना 'हारादिवत्' असे न म्हणता 'विभ्रमादिवत्' असे म्हणावे. या ठिकाणची समस्या केवळ दृष्टान्त व दार्ष्टान्तिकाची नाही तर अलंकार व काव्यशरीर यांच्या सापेक्ष अंतराविषयीची आहे ही गोष्ट आपण प्रामुख्याने ध्यानात घ्यावयास हवी.

### ७ "हारादिवत्" आणि "विभ्रमादिवत्"; एक नवे विश्लेषण–

अलंकार हे कोणत्याच खऱ्या अर्थाने काव्यस्वरूपापेक्षा बाहेरचे नसतात. परंतु "विभ्रमादिवत्" आणि "हारादिवत्" या दोन विशेषणांचा एका निराळ्याच भूमिकेतून विचार करणे शक्य आहे. विभ्रमादिवत् म्हणजे "सापेक्षतेने जवळचे किंवा अधिक योग्य"; आणि हारादिवत् म्हणजे "सापेक्षतेने दूरचे किंवा कमी योग्य" असे अर्थ घेऊन विश्लेषण केल्यावर ही दोनही विशेषणे अलंकारांच्या बाबतीत लागू पडतात असे दिसून येते.

कोणत्याही आविष्काराचे दोन प्रकार असतात, एक बहिर्मुख ( extra - version ) आणि दुसरा अंतर्मुख ( intra-version ) जर एखादा अलंकार हा अंतर्मुखतेतून निर्माण होत असेल तर तो काव्याचा एक अविश्लेष्य असा महत्त्वाचा घटक बनतो ( organic component ). तसेच जर अलंकार हे बहिर्मुखतेतून निर्माण होत असतील तर ते प्रायः कृत्रिम होतात व सापेक्षतेने दूरचे व कमी योग्य ठरतात. आत्मनिष्ठता (subjectivity) हे काव्याचे एक महत्त्वाचे अंग आहे. जर अलंकार हे काव्यातील आत्मनिष्ठ अनुभवाच्या स्फटिकीकरणाला ( crystallization ) किंवा सुमूर्त रूप देण्यास, स्वतः आत्मगत होऊन साहाय्य करीत असतील तर ते अलंकार 'योग्य' व 'जवळचे' ठरतील. परंतु जेव्हा अलंकार आत्मनिष्ठ अनुभव सुमूर्त करण्यास मदत करीत नाहीत व आत्मगत न होता बहिर्मुख आणि वस्तुनिष्ठ राहातात त्या वेळेस ते 'दूरचे' व 'कमी योग्य' ठरतील.

या ठिकाणी काव्याच्या कारणांचे एक विश्लेषण अत्यंत आवश्यक आहे. प्रतिभा, व्युत्पत्ती व अभ्यास यांच्याकडे निराळ्या दृष्टीतून पाहिले पाहिजे. प्रतिभेचा अर्थ स्फूर्ती ( intuition ) आणि कल्पनाशक्ती ( imagination or fancy ) असा दोन्ही प्रकारांनी होतो. "शक्तिः कवित्वबीजरूपः संस्कारविशेषः" या ठिकाणी प्रतिभेचा स्फूर्ती असा अर्थ आहे तर "...संशयः प्रतिभोत्थितः" अशा ठिकाणी प्रतिभेचा अर्थ कल्पनाशक्ती असा होतो. व्युत्पत्ती म्हणजे अनुभवांनी व प्रयत्नांनी मिळविलेले ज्ञान, तर अभ्यास याचा तात्पर्यार्थ कौशल्य ( Skill ) असा आहे. यापैकी स्फूर्ती व कल्पनाशक्ती हे आत्मनिष्ठ ( subjective ) घटक आहेत तर ज्ञान व कौशल्य हे त्या दृष्टीने वस्तुनिष्ठ ( objective ) आहेत.

अलंकारांचा मूळ उगम हे ज्ञान व कौशल्य यातून होत असतो. त्यांच्याशिवाय अलंकार अस्तित्वात येणेच अशक्य आहे. या ठिकाणी आपणास 'हारादिवत्' व 'विभ्रमादिवत्' असे मागे सांगितलेल्या अर्थाने अलंकारांचे विभजन करणे शक्य होते. काव्यनिर्मितीच्या प्रक्रियेचे दोन प्रकार इथे ध्यानात घ्यावयास पाहिजेत.

* ( १ ) स्फूर्ती व कल्पनाशक्ती ही ज्ञान व कौशल्य यांच्या द्वारा कार्य करीत असते व ज्ञान आणि कौशल्य मात्र बाह्य राहतात. ( The intuition and imagination working through knowledge and skill.)

( २ ) ज्ञान व कौशल्य हे आत्मनिष्ठ होऊन स्फूर्ती व कल्पनाशक्ती यांची उंची वाढविणारे संस्कारक घटक होऊन स्फूर्ती व कल्पनाशक्ती यांच्या द्वारा कार्य करतात. ( The knowledge and skill working through intuition and imagination, as quality-improving elements. ) *

पहिल्या प्रक्रियेत ज्ञान व कौशल्य हे शेवटपर्यंत बाह्य व वस्तुनिष्ठ राहातात आणि आत्मनिष्ठ अनुभूतीचे ( subjective experience ) स्फटिकीकरण होण्यात योग्य भाग घेत नाहीत. दुसऱ्या प्रक्रियेमध्ये ज्ञान व कौशल्य हे बाह्य व वस्तुनिष्ठ ( objective ) न राहाता आत्मनिष्ठ होऊन स्वाभाविकपणेच आत्मगत अनुभूती सुमूर्त होण्यास साहाय्य करतात.

## हारादिवत् अलङ्कार

येथील पहिल्या प्रक्रियेतून, बहिर्मुखतेतून ( extraversion ) जन्मास येणारे अलंकार हे सापेक्षतेने दूरचे व कमीयोग्य ठरतात. येथे उत्स्फूर्ततेपेक्षा ज्ञान व कौशल्य यांचेच प्राधान्य असते. कालिदासाचाच एक श्लोक इथे वानगीदाखल घेता येईल.

" रामादेशादनुगता सेना तस्यार्थसिद्धये ।
पश्चादध्ययनार्थस्य धातोरधिरिवाभवत् ॥ "
( रघु– १५–९ )

–अध्ययनार्थक इ धातूच्या मागे ' अधि ' हा उपसर्ग जसा जातो तशी शत्रुघ्नामागे सेना गेली[1] ही उपमा अशा प्रकारे " सापेक्षतेने दूरची व कमी योग्य " आहे. अशा प्रकारच्या अलंकारांना हारादिवत् म्हटल्यास गैर नाही.

## विभ्रमादिवत् अलंकार

जिथे कल्पनाशक्ति व स्फूर्ती ही ज्ञान व कौशल्य यांनी आत्मगत होऊन उंचावलेली असते त्या दुसऱ्या अंतर्मुखतेच्या ( intraversion ) प्रक्रियेतून जन्मास येणारे अलंकार हे " योग्य " असून " जवळचे " असतात. त्यामुळे त्यांना ' विभ्रमादिवत् ' असे म्हणावे.

" ददर्श राजा जननीमिव स्वाम्
गामग्रतः प्रस्नविणीं न सिंहम् ॥ "
( रघु–२–६१ )

–या ठिकाणची आईची दिलेली उपमा अतिशय सहज व स्वाभाविक असून उत्स्फूर्त वाटते. अशा-प्रकारचे " सापेक्षतेने जवळचे व अधिक योग्य " अलंकार ' विभ्रमादिवत् ' आहेत.

आधुनिक काव्याच्या बाबतीत जर सामान्यतः म्हणायचे झाले तर अलंकार जसे प्रतिमेच्या स्वरूपा-जवळ जातात तसे ते ' हारादिवत् ' या पातळीपासून ' विभ्रमादिवत् ' या पातळीकडे जातात असे म्हणता येईल.

## ८. अलंकारमञ्जूषेतील अलकारकल्पना

अठराव्या शतकात, पेशवाईच्या काळात होऊन गेलेल्या भट्ट देवशंकर पुरोहित या आलंकारिकाने स्वतःच्या ' अलङ्कारमञ्जूषा ' या ग्रंथात अलंकाराची सामान्य कल्पना मोठ्या विस्ताराने विवेचित केली आहे. आजपर्यंत मांडल्या गेलेल्या अलंकारांच्या " काव्यशोभाकरान् धर्मानलङ्कारान् प्रचक्षते " (काव्यादर्श ) किंवा " अङ्गाश्रिता अलङ्काराः " (काव्यानुशासन ) अशा व्याख्यांमध्ये अलंकारांचे प्रत्यक्ष मूळ स्वरूप मुळीच स्पष्ट झालेले दिसत नाही; तर केवळ अलंकारांच्या कार्याचा व स्थानाचा उल्लेख आहे. अलंकारांचे खरे स्वरूप अंतर्रचना आणि अंतर्गत घटकांचे कार्य यांचे यथार्थ दर्शन हे अलङ्कारमञ्जूषेने आपल्या अलंकार कल्पनेत घडविले आहे. अलंकाराचे लक्षण सांगणारी कारिका अशी आहे–

" रसादिभिन्नव्यङ्ग्यान्यत् शब्दार्थयोश्च या पृथक् ।
चमत्कारप्रभवता तदवच्छेदकमलङ्क्रिया [2] ॥ "

या कारिकेतील आशयाचा त्याने न्यायघटित भाषेत केलेला परिष्कारच अतिशय महत्त्वाचा आहे—

" **इतराङ्गीभूतरसभावभिन्नव्यङ्ग्यभिन्नत्वे सति शब्दार्थ–अन्यतरनिष्ठ – विषयितासम्बन्धावच्छिन्न – चमत्कृति – जनकतावच्छेदकत्वं काव्यालङ्कारस्य लक्षणम् ।** "

या लक्षणांतील घटकांचा क्रमाने विचार करावयास हवा. ( १ ) इतराङ्गीभूतरसभावभिन्नव्यङ्ग्य- इतरांना अंगभूत झालेला जो रसभाव त्यापेक्षा वेगळे असलेले व्यङ्ग्य. ( २ ) तद्भिन्नत्वे सति-त्या व्यङ्ग्यापेक्षा अलंकारांमधील चमत्कृती वेगळी असते. अशा प्रकारे गुणीभूतरसभावाचा या आलंकारिकाने अलंकारांच्या चमत्कृतीत अंतर्भाव केला आहे. त्यामुळे सारी वाच्य-चमत्कृती व गुणीभूतरसभाव या दोन्हींचा अलंकारचमत्कृतीत समावेश होतो. या गुणीभूतरस-ध्वनीचा अलंकारचमत्कृतीत अंतर्भाव असल्याने ' रसवत् ' अलंकार सिद्ध होतो. ' रसवत् ' अलंकारात रस हा व्यङ्ग्यच असतो पण केवळ तो त्याच श्लोका-तल्या दुसऱ्या रसाच्या दृष्टीने गौण असल्याने त्या

---

१. — " यथा ' इङिकावध्युपसर्गं न व्यभिचरते ' इति न्यायेनाध्युपसर्गः स्वयमेवार्थसाधकस्य धातोः संनिधिमात्रेणोपकरोति सेनापि तस्य तद्वत् इति भावः " – मल्लिनाथ ।

२. – " Alamkāra has as its distinguishing characteristic, the feature of both, the word and the sense, severely giving rise to poetical charm, which is other than the Vyaṅgya excluding the rasa etc. "








दुसऱ्या रसाचा उपस्कारक किंवा अलंकार ठरतो. पुन्हा मुख्य रस हा अलंकार न ठरेल अशा रीतीने गौण-रसाचा अलंकारचमत्कृतीत अंतर्भाव करण्यात लेखकाने चातुर्य दाखविले आहे.[३]

पुढील भागात शब्द व अर्थ यापासून ही विशिष्ट चमत्कृती कशी निर्माण होते हे सांगितले आहे. '**शब्द-अर्थ-अन्यतरनिष्ठ**' असे शब्द वापरल्याने स्वाभाविकपणेच शब्दालंकार व अर्थालंकार हे भेद स्पष्ट होतात.

शब्दार्थांच्या ठिकाणी चमत्कृती निर्माण करण्याचे सामर्थ्य ( चमत्कृतिजनकता ) असते. व हे सामर्थ्य 'विषयिता-संबंधाने' निर्माण होते. शब्दार्थ व त्यांचे ज्ञान यामध्ये शब्द व अर्थ हे ज्ञानाचे विषय होतात व ते ज्ञान 'विषयि' ठरते. ज्ञान हे 'विषयि' झाल्यावर 'ज्ञानता–संबंध' किंवा 'ज्ञाना–द्वारा–संबंध' म्हणजेच हा 'विषयितासंबंध' ठरतो. ( शब्दार्थयोर्ज्ञातयोरेव चमत्कारजनकत्वमिति सा जनकता विषयिता-सम्बन्धावच्छिन्ना । ) शब्दार्थांचे ज्ञान झाल्यावरच त्यांच्या ठिकाणी चमत्कृती निर्माण करण्याचे सामर्थ्य येते. म्हणून शब्दार्थांची चमत्कारजनकता ही 'विषयितासंबंधाने' किंवा ज्ञानाद्वारा आहे.

शब्दार्थ आणि चमत्कृती यांच्या कार्यकारणसंबंधामध्ये हा 'विषयितासंबंध' एक मधली पायरी म्हणून घालण्यामागे एक महत्त्वाचे कारण आहे. चमत्कृतीचा अनुभव आत्म्याला येतो म्हणजेच तो आत्म्याच्या ठिकाणी असतो. परंतु त्या चमत्कृतीचे कारण जे शब्द व अर्थ ते मात्र आत्म्याच्या ठिकाणी नसतात. अशा रीतीने आत्म्याच्या ठिकाणी नसलेल्या शब्द व अर्थ यांनी आत्माच्या ठिकाणी चमत्कृती निर्माण करणे यात कार्य व कारण यांचे वैयधिकरण्य होते.[४] ही विसंगती दूर करण्यासाठी देवशंकर पुरोहितांनी शब्दार्थ हे कारण व चमत्कृती हे कार्य यांमध्ये 'विषयितासंबंधाचा' किंवा थोडक्यात म्हणजे ज्ञानाचा संबंध अपरिहार्य मानला आहे. शब्दार्थांचे ज्ञान आत्म्याच्या ठिकाणी समवायाने असते पण शब्दार्थ नसतात. त्यामुळे शब्दार्थ हे ज्ञानाद्वारा आत्म्याच्या ठिकाणी असतात असे म्हणणे शक्य आहे. त्या आत्म्याच्या ठिकाणी असलेले हे शब्दार्थांचे ज्ञान आत्म्याच्याच ठिकाणी चमत्कृती निर्माण करते. शब्द व अर्थ यांचे ज्ञान किंवा 'विषयितासंबधाने' शब्दार्थ हे कारण व चमत्कृती हे कार्य हे दोन्ही समवायाने आत्म्याच्या ठिकाणी असल्याने तिथे वैयधिकरण्य न येता सामानाधिकरण्य येते आणि योग्य सुसंगती लागते. या साऱ्या विवेचनातून दिसून येते ती अलंकारांमागे असलेली प्रक्रिया होय. पुढे दिलेल्या क्रमाने अलंकारांची प्रतीती येते असे दिसून येईल.

( १ ) विशिष्ट शब्द व अर्थ

( २ ) त्यांचे ज्ञान.

( ३ ) ते ज्ञान समवायाने आत्म्याच्या ठिकाणी चमत्कृती निर्माण करते.

( ४ ) अशा प्रकारची चमत्कृती निर्माण करणे हे अलंकारांचे व्यवच्छेदक-धर्म असलेले कार्य होय.

शेवटी अलंकार मञ्जूषेचे अलंकार-लक्षण आपल्याला सामान्यतः असे मांडता येईल – " गुणीभूत असा रसध्वनि वगळून राहिलेल्या ध्वनीपेक्षा निराळी अशी चमत्कृती आत्म्याच्या ठिकाणी समवायाने स्वतःच्या ज्ञानाद्वारा निर्माण करण्याचे जे शब्दांचे किंवा अर्थांचे सामर्थ्य ते अलंकारांचा व्यवच्छेदक धर्म आहे. "

---

३.– " रसवदाद्यलङ्कारेऽतिव्याप्तिवारणाय रसभावभिन्नत्वं व्यङ्ग्यविशेषणम् । मुख्यरसादावतिव्याप्तिवारणाय 'इतराङ्गीभूत' इति रसादिविशेषणम् । "

अ. मञ्जूषा ।

४. " तादृशविषयितायाः कारणतावच्छेदकसम्बन्धभूतायाः स्वाश्रयसमवायित्वसम्बन्धेन स्वाश्रयज्ञानसम्बन्धेन वात्मनि कार्यकारणयोः वैयधिकरण्यम् । स्वाश्रयज्ञानसमवायित्वादिकं सम्बन्धसम्बन्धमभ्युपेत्यैव विषयितायाः प्रकृते कारणतावच्छेदकसम्बन्धताङ्गीकारात् शब्दार्थान्यतरनिष्ठा कारणता स्वविषयकज्ञानसमवायित्वसम्बन्धावच्छिन्ना वा वाच्या । अन्यथा कार्यकारणयोर्वैयधिकरण्यं स्यात् । " अलंकारमञ्जूषा








प्रा. भाऊ मांडवकर

# ‘आज्ञापत्रा’वर नवा प्रकाश

## प्रा. बनहट्टींचा दावा

‘आज्ञापत्र’ या ग्रंथाच्या कर्त्यासंबंधी बरीच चर्चा आजवर झालेली आहे. रामचंद्रपंत अमात्य हा त्या ग्रंथाचा कर्ता असावा, असे बहुतेक टीकाकारांचे मत असून डॉ. वि. भि. कोलते यांच्या मते ‘आज्ञापत्रा’चा कर्ता नीळकंठ मोरेश्वर पिंगळे हा आहे; तर प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी या ग्रंथाचे कर्तेपण श्रीशिवाजी महाराजांकडे जात असल्याचे प्रमेय मांडले आहे. प्रा. बनहट्टी यांचे विवेचन विस्तृत व अभ्यासपूर्ण आहे. त्यांनी आपल्या विवेचनात ‘स्वाभाविक’ असे ‘अनुमान’ काढताना लिहिले आहे– “ज्या महानुभाव व्यक्तीचे विचार, तत्त्वे आणि धोरणे या प्रबंधात (आज्ञापत्रात) प्रतिबिंबित झाली आहेत त्याच व्यक्तीकडून याची निर्मिती झाली असावी. पुष्कळ चिंतनाअंती प्रस्तुत लेखकाचे असे मत झाले आहे की, या राजनीतीचे कर्ते प्रत्यक्ष शिवाजी महाराज होत, **दुसऱ्या कोणाच्या बुद्धीतून ही निघालेली असणे शक्य वाटत नाही.**[१] ”

प्रा. बनहट्टींचे हे मत स्वीकारण्यात अडचणी असल्यामुळे ते पुन्हा तपासण्याची आवश्यकता आहे. ‘पंचोपाख्यान’ ह्या काव्याच्या वाचनानंतर प्रा. बनहट्टींचे मत अजमावू गेल्यास शिवाजीमहाराजांकडे ‘आज्ञापत्रा’चे कर्तेपण जाणे अशक्य वाटते. महालिंगदास नामक कवीने शके १५०० च्या पूर्वी हे ‘पंचोपाख्यान’ लिहिले असून त्याचा कळत–नकळत, स्पष्टास्पष्ट असा फार मोठा प्रभाव संपूर्ण ‘आज्ञापत्रा’वर पडला आहे, हे सत्य प्रकट करण्याची नितान्त आवश्यकता आहे आणि त्या हेतूनेच ‘आज्ञापत्र’ व ‘पंचोपाख्यान’ यातील विलक्षण साम्ये शोधण्याचा प्रपंच करीत आहे. ‘शिवाजी महाराजांव्यतिरिक्त ‘दुसऱ्या कोणाच्या बुद्धीतून ही (राजनीती) निघालेली असणे शक्य नाही.’ ह्या बनहट्टीकृत विधानाला फार मोठी तड जावी एवढी या ‘आज्ञापत्रा’त ‘पंचोपाख्याना’ची उसनवारी आहे.

## ‘पंचोपाख्यान’ व ‘आज्ञापत्र’ यांच्या लेखनाचा उद्देश

भक्तीची रूढ चाकोरी सोडून काव्य लिहावयास प्रवृत्त झालेला कवी म्हणून महालिंगदासाचा मान आहे. ह्या कवीने ‘अश्वविद्ये’ सारखे विषय हाताळले आहेत. ‘पंचतंत्रा’वरील ‘पंचोपाख्यान’ ही ओवीबद्ध टीका महालिंगदासाने ‘बाळ्याभोळ्या’ साठी करून व्यवहारज्ञान प्रसृत करण्याचा हेतू उराशी बाळगलेला दिसतो. या कवीने आपल्या टीकेसाठी ‘पंचतंत्र’ आधाराला घेतले असले तरी त्याचे लेखन बऱ्याच जागी स्वैर, स्वतंत्र व मौलिक पद्धतीने झालेले आहे. ‘आज्ञापत्रा’-तील ‘राजनीती’ मध्ये या ‘पंचोपाख्याना’ तील ओव्यांचे, भाषेचे व वर्णनाचे पडसाद ठायीठायी उमटलेले आहेत.

आज्ञापत्राच्या आरंभीच्या भागात “चिरंजीव **राजकुमार...राजकार्यी सुशिक्षित व्हावेत**[२]” म्हणून ही ‘राजनीती’ सांगण्यात आली आहे, अशी माहिती आलेली आहे. राजपुत्रांच्या सुशिक्षणासाठी प्रामुख्याने ‘आज्ञापत्रा’चे लेखन आहे आणि त्याच हेतूचा पाठपुरावा ‘पंचोपाख्याना’त केलेला आहे. राजाने ‘तीघे राजपुत्र’ विश्णुश्रम्या’ जवळ आणून त्यास विनविले आहे–

१. **श्री. ना. बनहट्टी :** आज्ञापत्र अर्थात शिवाजी राजांची राजनीती (१९६१) – उपोद्घात पृ. ४७.

२. आज्ञापत्र (**बनहट्टी प्रत**) प्र. २, पृ. १२ (**हे व** यापुढील ‘आज्ञापत्रासंबंधीचे आकडे बनहट्टी–प्रतीतील आहेत.)






त्यांसी **सीकवावी वीद्या**
**बुधी धृती राजनीतीच्या**[1]

यावरून 'पंचोपाख्याना'ची (वा पंचतंत्राची) रचना ज्या हेतूने झालेली आहे, तो हेतू 'आज्ञापत्र'-कर्त्याच्याही मनात वसत होता, हे ओघानेच दिसून येते. 'राजकुमार राजकार्यी सुशिक्षित व्हावेत' हे 'आज्ञापत्रा'तील वाक्य 'सीकवावी वीद्या बुधी धृती राजनीतीच्या' ह्या ओवीतील शब्दांशी मिळतेजुळते आहे.

तसेच 'आज्ञापत्रा'त आणखी लिहिले आहे की, "स्वामींनी **यथाशास्त्र राजनीती** या आज्ञापत्रारूढ केली आहे.[2]" या वाक्यातील 'राजनीती' हा शब्द 'पंचोपाख्याना'तील वरील ओवीत आहेच. 'यथा-शास्त्र' हा शब्द 'आज्ञापत्र'कर्त्याने सहेतुकपणे वापरलेला दिसतो. 'यथाशास्त्र' हा शब्द लिहिण्यामागे लेखकाच्या चित्तात पूर्वसूरींच्या उसनवारीची जाणीव असावी. 'पंचोपाख्यान' वा 'पंचतंत्र' यात आलेल्या शास्त्राप्रमाणे" असे तर 'यथाशास्त्र' या शब्दावरून सुचवावयाचे नसेल ना ?

'आज्ञापत्र'कर्त्याने वरील हेतूला उपोद्बलक असे उद्गार पुढीलप्रमाणे काढले आहेत– "राजकुमारा-जवळील शिक्षा करणार सभ्य मनुष्ये एकदोन-चार यैसी ठेवावी... शास्त्राभ्यास लेखनाभ्यास अनालस्यपणे, निष्ठुरवादे करवात्रा.... त्यांकडून त्या विद्येचा अभ्यास करवीत जावा.[3]"

'आज्ञापत्र'कर्त्याचा एक मुख्य हेतू राजकुमार-शिक्षण हा आहे आणि तोच 'पंचोपाख्यान'कर्त्याचा एक मुख्य हेतू आहे. बाकी हेतू 'वरकड' आहेत, असे म्हणायला हरकत नाही.

## समान सूत्ररूप रचना

'आज्ञापत्रा'तील कित्येक वाक्ये सूत्ररूप वा सूक्तरूप अशी आहेत. विशेष हे की, 'आज्ञापत्रा'तील कित्येक सूत्र-वाक्ये 'पंचोपाख्याना'त जशीच्यातशी आढळतात. त्या ग्रंथातील ओव्यांमधील भाव शब्दशः 'आज्ञा-पत्रां'ने गद्यात उतरवलेला आढळतो. 'पंचोपाख्याना'त सुचविलेले सूत्र घेऊन 'आज्ञापत्र'कार त्याचा विस्तार करून सलग मांडणी करण्याचा प्रयत्न करताना दिसतो.

एकेका विषयावर या दोन्ही ग्रंथात वर्णने कोणत्या धोरणाची आढळतात ते पाहू या.

## प्रजा, अश्वबळ आणि नृप

'पंचोपाख्यान'कार पुढील सूत्र ओव्यांत सांगतो–

(१) जया प्रजा तया धन।
ज्या अस्वदळ त्या बळसाधन।
त्या मेदनीं जन।
ऐसें बोलीलें वचन नीतीमाजी[4]।

(२) जया प्रजा वैस्ये[5] होती।
त्या होये धनंप्राप्ती।
जया अस्व बहुत मीळती।
त्या मेदनी हाता च्हढे[6]॥

'आज्ञापत्रा'त वरील विचार जसेच्या तसे दिसतात– "जैसे ज्यास अश्वबळ, त्याची पृथ्वी प्रजा आहे.[7]" दोन्ही ग्रंथांतील हे असामान्य साम्य! 'आज्ञापत्रा'तील 'प्रजा' वर्णन पुढीलप्रमाणे आणखी असून त्याचा तोंडवळा वरच्यासारखाच दिसतो– "राज्यातील प्रजा म्हणजे तोच राज्याचा जीवनोपाय.[8]"

पंचोपाख्यानात राजाचे प्रजेसंबंधीचे कर्तव्य काय ते सांगितले आहे–

(१) क्षत्रीयाची लक्षनें। 'प्रजा लोक पाळने[9]'।
(२) प्रजा राखी दुष्ट पीडन करी।
तो राजा म्हनीजे पवित्र भारी।
वीद्य तो अवधारीं[10]॥

---

१. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. ३० (हे व यापुढील 'पंचोपाख्याना'तील आकडे मला उपलब्ध झालेल्या 'पंचोपाख्यान'–पोथीतील आहेत.)
२. आज्ञापत्र : प्र. २, पृ. १२.
३. आज्ञापत्र : प्र. ३, पृ. २४.
४. पंचोपाख्यान : अ. २, ओ. ३९.
५. वैस्ये = वश.
६. पंचोपाख्यान : अ. ३, ओ. १८०.
७. आज्ञापत्र : प्र. ९, पृ. ५८.
८. आज्ञापत्रः प्र. २, पृ. ६.
९. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. ३३.
१०. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. २८.



अनुक्रमणिका






'आज्ञापत्रा'तील वाक्य असे आहे– "सार्वकाळ अप्रमत्त होऊन प्रजेचे हितकार्यी सादर असावे.'[१]" ज्याप्रजेस जिकडून उपद्रव होणार तो सर्वही चुकविला.' "

'पंचोपाख्यान' काराने अश्वबळाने राज्य हाती राहते, असे सुचविले आहे, तर 'अश्वबळाने पृथ्वीच प्रजा होऊ शकते' हा भरवसा 'आज्ञापत्र'काराने दिलेला आहे. 'आज्ञापत्रा' त 'चाळीस हजार पागा व साठसत्तर हजार सिलेदार संपादिल्या'[२]चा उल्लेखही अश्वबळाची महती वाढविणारा आहे.

## अनाथ–नाथ नृपती

राजाने 'दुष्टपीडन करावे[३]' असे सांगणारा महालिंगदास म्हणतो–

> रावो म्हनीजे ॥ स्याहानां जो दुष्टांसी दंडीजे ॥
> नांतरी प्रतीपाळ दीनाचा कीजे ॥
> ऐसा राजा असे[४] ॥
>
> दुर्बळा आनीं अनाथा ॥ बाळ वृधा तपश्रीया तथा॥
> रावो होये सांहें करीता ॥ तो नीती बोलीजे[५] ॥
> दुष्टा दंडीजे । सुष्टासी बरवें पुजीजे ॥
> ऐसी राजनीती बोलीजे[६] ॥

'आज्ञापत्र'कार महालिंगदासाचा अनुवाद करतो, "अंध, पंगु, आतुर, अनाथ, अनुत्पन्न जे असतील त्यांचे ठाई भूतदया धरून ते निवांत असिजे तों त्यांचा जीवनोपाय करून देऊन चालवीत जावे.[७]" महालिंगदासाची "दुबळी आनीं अनाथा ॥ बाळवृधा तपश्रीया" त्यांना साह्य करण्यासंबंधीची सूचना 'आज्ञापत्रा'त नकललेली आहे. तपस्व्यांचा आदर करावयाला 'आज्ञापत्र'कार सांगतो[७] व सत्पुरुष, देवतायने पूजावयासाठी राजाला सुचवितो.[७] 'सुष्टासी बरवे पुजीजे' यात महालिंगदास तेच सांगतो.

"न्याय अन्याय पाहून यथाशास्त्र शासनाचा निश्चय करून शासन करणे, क्षुद्रांस नियमावरी ठेवणे[८]" ही 'आज्ञापत्रा'ची आज्ञा "अनर्गल उत्पाती ... होते त्यांस मारून गर्देस मेळविले[९]" अशा स्वरूपात अमलात आलेली आहे; तर महालिंगदासाने 'आज्ञापत्रा'पूर्वीच हे अशा तऱ्हेने सांगितले आहे ––

> दुष्टा दंड करावा ॥ सन्मान साधुसी द्यावा ॥
> गुरु बरव्या परीं पुजावा ॥ स्तुती करावी देवाची ॥
> तरी अपराधेंवीन ॥ प्रानीं मारूं नंये जान'[१०] ॥
> राजा होउनीं खोटीयासी शास्ती न करी ॥
> त्यासी यश नेदी राजश्री[११] ॥

"संपूर्ण प्रजेला अभय देऊन निरुपद्रवी केली[१२]" ही आज्ञापत्राची माहिती आहे. 'अभय दिलेल्यास मारू नये" असे पंचोपाख्यानाचे म्हणणे आहे.[१३]

## राजाचे गुण

राजाने 'स्वांगे अमानुष्य पराक्रम[१४]' करण्यावर 'आज्ञापत्रा'चा भर आहे. 'युद्धाव्यतिरिक्त फक्त स्वरक्षणाविषयी राजाने सावध असावे, अर्थात युद्धसमयी शरीराची पर्वा करू नये[१५]' असे 'आज्ञापत्र' सुचविते. महालिंगदास राजाच्या बाबतीत लिहितो–

> (१) सामीमानुं पंथे ॥ तो श्रेष्ट राया'[१६] ॥
> (२) रीपुरक्तें जेनें टीळकु नांही लावीला ॥
> रीपु-आरी अस्वपात भुनीं नांहीं पडला ॥
> तो संसारा नांहीं आला ॥ऐसे जानावें'[१७]॥
> (३) जेनें राज्य करावें ॥ तेनें बरें वोखटें मना आनांवें ॥
> सुभासुभ चीतीं योजावें ॥ तरी पराभव न पवे '[१८]॥

१. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. १४ व प्र. १. ७.
२. आज्ञापत्रः प्र. १, पृ. ५ व प्र. २, पृ. ८.
३. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. २८.
४. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. २४.
५. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. २७.
६. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. ५२७.
७. आज्ञापत्र : प्र. २, पृ. १५.
८. आज्ञापत्र : प्र. ४, पृ. २८. ९. आज्ञापत्र : प्र. २, पृ. ८.
१०. पंचोपाख्यान : तंत्र ४, ओ. ३४२–३४३.
११. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. ५२३.
१२. आज्ञापत्र : प्र. २, पृ. ८.
१३. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. ५२२.
१४. आज्ञापत्र : प्र. १, पृ. ४.
१५. २. आज्ञापत्र : प्र. ३, पृ. १६.
१६. पंचोपाख्यान : तंत्र ३, ओ. १५४.
१७. पंचोपाख्यान : तंत्र ३ ओ. १५८. १८.
१८. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. ५१६.



अनुक्रमणिका







(४) प्रचंड शस्त्र हाती धरनें ।। पराभवनें
परसैन्यें[१] ।।

'प्रचंड शस्त्र हाती धरने, पराभवनें परसैन्यें' या वचनाचेच 'स्वांगे अमानुष्य पराक्रम करणे' हे प्रतिरूप आहे, असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

राजाच्या सगुणपणाचे वर्णन करणाऱ्या महालिंगदासकृत काही ओव्या–

काही सत्य काही असत्ये ।।
काही बोल प्रीयेत कांहीं अप्रीयेत ।।
काहीं सीका कांहीं धीर्यत ।।
अैसा राजा असावा ।।
कांहीं दयाळु ।। कांही अनकृपाळु ।।
आनी असावा दानसीळु ।।
सगुन आनी वेचाळु ।।
अैसा राजा पाहीजे[२] ।।

राजाला अशा सूक्ष्म सूचना 'आज्ञापत्रा'नेही दिलेल्या आहेत व त्या 'आज्ञापत्रा'त मधूनमधून पेरलेल्या आहेत.

**प्रधान**

प्रधानाचे 'आज्ञापत्रा'तील वर्णन प्रसिद्ध आहे. "प्रधानेवीन राज्येवृधी हे सुन्ये[३]" हे पंचोपाख्यानातील विधानही तसेच शैलीपूर्ण आहे. प्रधान 'सधैर्य' असावा, दुराग्रही नसावा[४] असे आज्ञापत्र सांगते; तर "जो प्रधान सुष्ट नेने। धृतीच्याही असे उघटपन। तो नव्हेची सन्मान। वीटंबनाची पावे[५]" असे 'पंचोपाख्यान' म्हणते. प्रधान हा 'स्वामीसेवकभाव जाणोन वर्तते'[६] असा असावा ही 'आज्ञापत्रा'तील भावना 'पंचोपाख्याना'त 'प्रधान जरी जाला। स्वामीसेवे पुर्न देखीला'[७] अशा स्वरूपात प्रकट झालेली आहे. 'राजा अथवा प्रधानुं। दुरदृष्टी न घाली अज्ञानु ।। अनुकर्मे न देखे बुधीहीनु ।। त्याच्या राज्या नाशु आहे ।।[८] अशी सूचना देणारा महालिंगदास 'नाजूक' ज्ञान सांगतो––

प्रधान होउनी आपन ।।
रानीसी न कीजे मीत्रपन ।।
रानीने सेवकासी नं कीजे संभाशन् ।।
तो राज्या आवडे[९] ।।
युद्धेकाळीं पुढे राहीजे ।।
नगरांतु राजपुष्टी पुसीजे ।।
रानीवसां जातां वोसरीजे ।।
मागीला पाडली ।।
अैसा सेवक राजया प्रीये ।।
तो कहिंच अपमानीं न ये[१०] ।।

"अंतःपुरादि नाजूक नियम ते यथोचित रक्षणे"[११] हे प्रधानकार्य 'आज्ञापत्रा'ने सांगितले आहे. "परचक्राचा परिहार योजणे[११]" हे "आज्ञापत्रा'तील प्रधानकार्य 'पंचोपाख्याना'त 'युद्धकाळी पुढे राहीजे' या वाक्यातून प्रकट झाले आहे. "देशोदेशी वार्तिक प्रेरून वर्तमान आणवणे[११]" हे "आज्ञापत्रा'तील प्रधानकार्य 'पंचोपाख्याना'त 'नगरांतु राजपुष्टी पुसीजे' या वचनात आलेले आहे.

युद्ध, छापे, परस्पर भांडणे लावणे, मित्रभेद करणे इ. राजनीतीतील उपाय योजिल्याचे सांगून[१२] सामदामदंडभेदनीतीचा पुरस्कार करणाऱ्या 'आज्ञापत्र' काराने राजाचे पर्यायाने प्रधानाचे "समयविशेषे शत्रूस संधीविग्रह उपेक्षा जे कर्तव्य त्याचा यथोचित विवेक करून तदनुरूप प्रवर्त करणे[१३]" हे कार्य सांगितले आहे. 'पंचोपाख्याना'तील पुढील ओव्यांचा अनुवाद त्यात आढळेल–

साम्यें ह्मनींजे सीष्टाइ ।।
दाम्ये ह्मनीजे देउनी कीजे भलाइ ।।
वीधीभेद ह्मनीजे पांही ।।
कटक फोडीचे वैरीयाचें ।।
वीग्रह म्हनीजे जुंझनें ।। ऐसे हे च्याऱ्ही उपाये
जाने[१४] ।।

१. पंचोपाख्यानः तंत्र ३ ओ. ३३७.
२. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. ७२५ व ७२६.
३. पंचोपाख्यानः तंत्र २, ओ. ५९७.
४. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. ३०.
५. पंचोपाख्यानः तंत्र १, ओ ९१.
६. आज्ञापत्रः प्र. ३ पृ. ३०.
७. पंचोपाख्यानः तंत्र १, ओ. ९२.
८. पंचोपाख्यान : तंत्र ३ ओ. ५७४.
९. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. १०९.
१०. पंचोपाख्यान : तंत्र १, ओ. १०६ व १०७.
११. आज्ञापत्र : पृ. ४, प्र. २८.
१२. आज्ञापत्र : प्र. १ पृ. ४.
१३. आज्ञापत्र प्र. ४ पृ. २८.
१४. पंचोपाख्यान : तंत्र ३, ओ. १४९ व १५०.



अनुक्रमणिका








'पंचोपाख्यान'तील "तैसा रायाहुन ।। अति प्रधान जरी जाला सगुन ।। तया द्यावा मान । नीर्धारेंसी"[१] ह्या ओवीचा उपयोग करून घेऊन 'आज्ञापत्र'काराने "लक्षणीक प्रधान पाहून करावे"[२] (वरील ओवीतील 'सगुन' हा शब्द व येथील लक्षणीक हा शब्द पाहावा) असे सांगितले आहे व 'समयविशेषे आपला आग्रह सोडून त्याचा शब्द चालविलासा करावा" असे म्हटले आहे.[२] तसेच आपल्यापेक्षा गुणवान असलेल्या प्रधानाचा मान करावा-हे धोरण 'आज्ञापत्रा'त विस्तृत करून निराळ्या प्रकारे देण्यात आलेले आहे. राजांनी सोसक असावे[३], आपल्यातील दोष दाखविण्यासाठीही काही जवळचे सेवक असावे[३], आपल्याच युक्तीचा आग्रह न धरता इतरांच्या बुद्धीसही वाव द्यावा, इतरांचा गुणलोप होऊ देऊ नये[४] अशा ज्या सूचना 'आज्ञापत्रा'त आहेत, त्या महालिंगदासाच्या उक्त ओवीपेक्षा निखालस निराळ्या नाहीत! महालिंगदास प्रधानाला आणखी जाणीव देतो–

पुसलीयावीन सांगीजे ।। वांयांची बडबड न कीजे।।
वायेपट प्रधानी बोलीजे ।। तें राया नावडे ।।[५]

## सेवक

'दोन लक्ष पदाती[६]' किंवा 'वाढविलेला दळभार[७]' यांचे वर्णन आज्ञापत्राप्रमाणेच निराळ्या रूपात 'पंचोपाख्याना'त आहे.[८] राज-सेवक निष्ठावान असावेत[९]; परम शूर, विश्वासू, हुकूमबारदार लोक ठेवावेत[१०] असा 'आज्ञापत्रा'चा सूर आहे; तर 'येके वेळी मारीजे नागवीजे ।। परी तेनें स्वामीसी बोखटे न चींतीजे ।। ऐसा भृत्य बोलीजे ।। राजायोग्य[११] ।।" असे 'पंचोपाख्याना'चे कथन आहे. 'आज्ञापत्रा'त सेवकासंबंधीचे बारकावे सांगतांना म्हटले आहे– "तैसेच जवळील सेवक विश्वासू, सुज्ञ, आपला मनोदय जाणून वर्तते, इंगितसंज्ञा जाणते ... ऐसे लक्षणी परीक्षून ठेवावेत,[१२]" "वरकड कामे इशारतीने सांगावी.[१३]" हे विचार 'पंचोपाख्याना'तील पुढील ओवीवरून अनुवादलेले आहेत–

राजा अथवा अन्नेत्र ।।
तयाचें वोळखीजे भ्रूभंगनेत्र ।।
दुग्दृष्टी वगत्र ।।
देखतांची वोळखीजे[१४] ।।

चहाडखोर सेवक नसावेत, अन्यथा ते अमर्याद होतील[१५] ही आज्ञापत्राची भावना; तर 'जे राजी दोनीच्यारी चहाड होती "तेथे कैंची घडगती"[१६] अशी महालिंगदासाची घोषणा! 'समर्थ समर्थांवरी । कदापी कोप करी । परी हीनांवरी न करी[१७]' असे हा कवी म्हणतो; तर "स्वसामर्थ्ये सकलांवरी दया करून... स्वामिकार्ये घेतली[१८] राजेलोकी सेवकाचा दोष मुखे उच्चारीत जाऊ नये[१९]" न संतापता सेवकांचे दोष घालवावे[२०] असे 'आज्ञापत्र'कार सांगतो.

'आज्ञापत्रा'त वेतनाच्या बरोबर बाटपावर जोर देण्यात आला आहे. "सेवक लोकांची वेतनें नेमस्त करून बिलाकसूर पाववावी[२१]" सेवक लोकांची केली वेतने पाववावी,[२२] "योगक्षेमाविषयी अपेक्षा न पडे ऐसा स्वतां परामर्ष करून चाल-

१. पंचोपाख्यानः तंत्र १, ओ. १३९.
२. आज्ञापत्रः प्र. ४ पृ. २९.
३. आज्ञापत्रः प्र. २ पृ. २५–२६.
४. आज्ञापत्र : प्र. ३ पृ. १९.
५. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. ३९.
६. आज्ञापत्र : प्र. १, पृ. ५.
७. आज्ञापत्र : प्र. २, पृ. ८.
८. पंचोपाख्यान : तंत्र ३, ओ. १७९ १८२, १८४.
९. आज्ञापत्र : प्र. ३, पृ. १६.
१०. आज्ञापत्र : प्र. १ पृ. ८.
११. पंचोपाख्यान : तं. ओ. १२९.
१२. आज्ञापत्र : ३, पृ. १६.
१३. आज्ञापत्र : प्र. २ पृ. २४.
१४. पंचोपाख्यानः तंत्र १० ओ. ११५.
१५. आज्ञापत्र : प्र. ३, पृ. १६.
१६. पंचो : तं. १ ओ. ६८७.
१७. पंचो : तं. १, ओ. २१९.
१८. आज्ञापत्र : प्र. १ पृ. ४.
१९. आज्ञापत्र : प्र. २, पृ. २४.
२०. आज्ञापत्र : प्र. ३, पृ. २६.
२१. आज्ञापत्र : प्र. ३, पृ. १९.
२२. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. २७.



अनुक्रमणिका

वावे[१]", "त्यांस योगक्षेमाविषयी कोण्हाचे आर्जव न पडे तें करावे[१]", "हुजरातीतही मोइन बिलाकसूर पाववावी[२]". महालिंगदासाने याबाबत आधीच सांगून ठेवलेले आहे– "परीवार पायेकां। निश्चीत[३] कीजे ॥[४] "आपुले भृत्ये सन्मानीजे" त्यांसीं नीश्चीती कीजे[५] ॥" गडकोटावरील सेवकांच्या वेतनाबाबत दोघांचीही भूमिका अशीच आहे.[६] सेवकांच्या श्रमाचे चीज व्हावे असे दोन्ही लेखकांना वाटते. "ज्याने जो श्रम केला, त्याचा गुण कळोन तदनुरूप त्याचे श्रमाचे सार्थक करीजेते,[७]" "स्वता परामर्ष घ्यावा[८]", "केले कार्यानुरूप बहुमान करावा[८]", "सेवकलोकीं केले सेवेची अवगणना न करिता, यथान्याये, यथाधिकारे, यथोचित सेवक लोकांचे मनोधारण करून वर्तावे[९]" ही 'आज्ञापत्रा'ची वाणी 'पंचोपाख्याना'त "आपुलें भृत्ये सन्मानीजे, ....गौरवे सन्मान दीजे[१०]" या ओवीत संक्षेपतः पण पूर्णार्थ घेऊन प्रकटली आहे. 'आज्ञापत्रा'त या वाणीचा विस्तार इतरत्रही आलेला आहे.[११]

अलाउची, भले प्रामाणिक लोक नेमावेत असे 'आज्ञापत्र' आवर्जून सांगते. "ज्या कार्यास जो जेथे योग्य तो तेथेच ठेऊन त्याचा उपयोग घ्यावा. ज्यांचा अधिकार जो असेल तो त्यांचेच हातून घेऊन अधिकारपरत्वे सकलावर सारखा लोभ करून... चालवावे[१२]" ही 'आज्ञापत्रा'ची शब्दमाला महालिंगदासाच्या पुढील ओवीतील आहे--

आनी अधिकार देउं यें ॥
त्यासीच दीजे रायें ॥
भला कुळीन होये ॥
तेनें दोसी नं होइजे[१३]"

## वतनदार, गुप्त चर्चा व शत्रूसंबंधी सूचना

"आज्ञापत्रा'त वतनदार राजनिष्ठ न राहता नूतन संपादून बळकट होतात हा भाव आहे.[१४] हीच भावना 'वतनदार' असे न म्हणता दुसऱ्या तऱ्हेने 'पंचोपाख्याना'त व्यक्त होते–

जो भृत्य स्वामींयांचे आसरीं ॥ समर्थ होये अवधारी ॥
काम अर्थ असो जरी ॥ तरी तो भृत्य वोखटा[१५] ॥
वेवसाउं जेहीं सारीखीं ॥ दळभार समर्थ आइक ॥
अर्ध देश व्यापुनी राहिला कीं ॥ तो भला नोहे[१६] ॥
भृत्य समर्थ न पाहीजे ॥ स्वामींयांपरस्यें[१७] ॥

इतर लोकांचा भरणा राज्यकारभारात अपेक्षेहून अधिक नको असे सुचविणारे 'आज्ञापत्र' गौप्य कार्ये गुप्ततेने करावयास सांगते;[१८] तर 'पंचोपाख्यान' सुद्धा "स्वल्प कार्ये जऱ्हीं जाले। जे येकांतीचे असैल ॥ ते सभेत नाही बोलीले।। येकांतीच बोलीजे[१९] ॥" असेच म्हणते.

"पराक्रांत राज्य हस्तवश्य करावे, त्यास संनिधवासी शत्रु म्हणजे केवळ उदरातील व्याधी, त्याचा पराभव आधी करावा[२०]" ही रचना महालिंगदासाच्या पुढील ओव्यांना पुढे ठेवून तर 'आज्ञापत्र' कर्त्याने केलेली नाही ना?—

व्याधी कोवळी असे जवे ॥ वोखद कीजे तव ॥
वैरीया करावा हाची भाव ॥ संदी पाहोनिया ॥[२१]
अथवा व्याधीस उतरे ॥ ते उर्धमानी संचरे,

१. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. १६.
२. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. २२.
३. निश्चीत = निश्चित.
४. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १८४.
५. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १७६.
६. आज्ञापत्रः प्र. २, पृ. ७; पंचो. ३–१८१.
७. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. १७.
८. आज्ञापत्रः प्र. ४, पृ. ३२.
९. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. १४.
१०. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १७६.
११. आज्ञापत्रः प्र, २, पृ. ७.
१२. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. १६.
१३. पंचोपाख्यानः तं. १; ओ. ५२८.
१४. आज्ञापत्रः प्र. ६, पृ. ३६–३७.
१५. पंचोपाख्यानः तंत्र १, ओ. ५३४.
१६. पंचोपाख्यानः तं. १, ओ. ५३५
१७. परस्ये=पेक्षा; पंचो-तं, १, ओ. ५३७.
१८. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. २८.
१९. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. ४४.
२०. आज्ञापत्रः प्र. २, पृ. ८.
२१. पंचोपाख्यानः तंत्र १, ओ. ७०६.






म्हणौनी हेची वीचारे ॥
मुळीहुनी फेडीजे तरी भले होये ॥ [१]

पराधीनता राज्यास अगदीच घातक असे आज्ञापत्राचे म्हणणे आहे.[२] 'पराधीन' "ज्याचें जीनें" "तो केवी सुखातें मानें"[३] असे 'पंचोपाख्यान' सांगते. "आपली सलाबत शत्रूवर पडोन शत्रूने अवाई खादली आहे. ... शत्रूस अवकाश घेऊं न देता आपण सेवासमुदायानसीं चालोन जाऊन शत्रूचा पराभव करावा[४] ..." ह्या 'आज्ञापत्रा'च्या उद्गाराशी जुळणारे महालिंगदासाचे विचार—

वैर जवें असे बळासी ।
सर्व सामग्री तयासी ।
तवं आपन स्थीर होईजे ॥
आपन अती नीर्बळा ।
वैरी असे सबळां ।
तेथें वीरोध करीतां केवळा ।
नासु असे आपनांसी ॥
वैरी सबळ जाला ।
कदाकाळीं उनां देखीला ।
तरी मारीजे वहीला ।
वेळ न लवीजे[५] ॥

खळा शस्त्रे भंगीजे । अथवा उपायें मारीजे[६] ॥
कोन्हीयके अवस्वरीं । वैरी उनां देखीजे अवधारीं ॥
तेव्हां झडकरी भारी । प्रयत्न कीजे[७] ॥

"शत्रूची उपेक्षा करणे, आजीचे उद्यावरी घालणे, हे परम अनुचित[८]" हे 'आज्ञापत्रा'चे कथन व "तेव्हा झडकरी भारी" हे महालिंगदासाचे वर्णन यात तफावत पाहु नये !

## स्वस्थान दृढ करून नूतन संपादणे

'आज्ञापत्रा'त पुढील मजकूर आहे – "ठाईं ठाईं बरी मजबुदी केली[९]" "तो प्रांत पाठीस घालोन बाहेरील अरिष्टे तिकडील तिकडे निवारण केली[९]" "आधी राज्याचा बंदोबस्त केलिया अनायासे इतर प्रयोजने सिद्धीस जातात[१०]" "असतील गडकिल्ले त्यांची यथोक्त मजबुती करावी.... पुढे जबरदस्तीने नूतन स्थळे बांधून, बांधीत बांधीत तो देश आक्रमावा.[११]" आता हे वर्णन महालिंगदासाने आधीच कसे करून ठेवलेले आहे, ते पाहा —

(१) आधी स्वस्थान दृढ कीजे । मग सामोरे चालीजे ।
यकायकी नव जाइजे । वैरीयाच्या ठायासी[१२] ॥
(२) वैरीयावरी चाल कीजे । तो आपुले राहाते स्थान दृढ कीजे[१३] ॥
(३) तेथे चारापानी असीजे ॥ तेथे मेळीकार कीजे[१४] ॥
(४) तेथुनी पाळती कीजे ...
मारा संचुनी कीजे । तेने धाकु पडे[१५] ॥
(५) वैरी उपजला देखीजे । तरी आपुले दुर्ग बळकट कीजे[१६] ॥

## दुर्ग

मराठ्यांचे राज्य किल्ल्यांवरून उभे राहिले. किल्ले हेच त्याकाळी राज्यरक्षणाचे फार मोठे साधन होते. 'आज्ञापत्र' कर्त्याने किल्ल्यांचे प्रकरण सविस्तर व आत्मीयतेने लिहिले आहे; तर महालिंगदासानेही या विषयावर अधिक लिहिले आहे. यासंबंधीचे गौरवपूर्ण, भावनोत्कट वर्णन 'आज्ञापत्र'कार मोठ्या जिव्हाळ्याने करतो– "गडकोट हेच राज्य, गडकोट म्हणजे राज्याचे मूळ, गडकोट म्हणजे खजिना, गडकोट म्हणजे सैन्याचे बळ, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे

१. पंचोपाख्यानः तंत्र १, ओ. ६४३.
२. आज्ञापत्रः प्र. २, पृ. २२, प्र. ३, पृ. १४.
३. पंचोपाख्यानः तं. १, ओ. ५८२.
४. आज्ञापत्रः प्र. २, पृ. ११.
५. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. ११६ ते ११८.
६. पंचोपाख्यानः तंत्र ३, १६०.
७. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १६५.
८. आज्ञापत्रः प्र. २, पृ. ९.
९. आज्ञापत्रः प्र. २, पृ. ७.
१०. आज्ञापत्रः प्र. २, पृ. ७.
११. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४५.
१२. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. १६९.
१३. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १६८.
१४. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १७०.
१५. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. १७१.
१६. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. १७५.



अनुक्रमणिका





आपले प्राणसंरक्षक."[१] "संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग!"[२]

पंचोपाख्यानाचा कर्तासुद्धा दुर्गवर्णन असेच उत्साहाने करतो—

(१) दुर्ग बळकट कीजे।
तेणें वैरी आपस्याची[३] भजीजे।
ज्यासी दुर्गबळ तैंची राज्ये[४] ॥
(२) जरी ठावो असे हातीं।
तयासी वैरी वैर करूं न सकती।
दुर्गाचेनी बळें वैरी हाता येती।
म्हणौनी दुर्ग बळवंत कीजे[५] ॥
(३) दुर्ग अवघट करवीले।
तेथे वैरीयाचें काहीं केलें।
न चले देखा[६] ॥
(४) जया गडदुर्ग आघट।
त्या भय कैंचें[७] ॥
(५) ज्यासी दुर्ग असे हाती।
तया भय कैचें[८] ॥
(६) ज्या हाती दुर्ग असे।
तो राजा बळीवंत दीसे।
त्या दळ फार अतीसें। लेखावें जना[९] ॥
(७) दुर्ग ज्याचे हाती। तोची सबळ ये क्षीती[१०] ॥
(८) दुर्गेवीन राज्ये करीतु। त्याचें राज्य स्थीर नव्हे[११] ॥
(९) दुर्गेवीन नृपनाथ। त्या कोण्हीं वस्ये[१२] नव्हे[१३] ॥
(१०) दुर्गेवीन जो नृपु। वैस्ये होये[१४] जान[१५] ॥
(११) तस्मात् या कारनें। दुर्ग दृढ करनें[१६] ॥

'आज्ञापत्र'कर्ता आणि 'पंचोपाख्यान'कर्ता या दोघाची सम-स्फूर्तिप्रद शैली मोठी रोचक आहे! 'आज्ञापत्रा'तील 'गडकोट हेच राज्य' हे मनोहर वाक्य 'ज्यासी दुर्गबळ तेंची राज्ये' या 'पंचोपाख्यानातील वाक्याहून वेगळे काढून दाखविता येणार नाही. गडांमुळे शत्रू ताब्यात राहतो हे 'आज्ञापत्रा'चे सांगणे आहेच. "दुर्ग बळकट असल्यास वैरी आपोआपच आपणास भजू लागतो' असे 'पंचोपाख्याना'चे कथन आहे. "अवघड दुर्ग हाती असलेला राजा या पृथ्वीवर बलवंत असून त्याच्यापुढे शत्रूचे काही चालत नाही. अशा दुर्गाधिपतीला पृथ्वीवर कोठलेच भय नसते. राजाजवळील दुर्गबळ मोठ्या सैन्याइतके असते. दुर्गाशिवाय राज्य स्थिर नसते. व तो राजा पराधीन होतो. दुर्गस्वामीला मात्र सर्व वश होतात."– ही बहुमोल वाणी महालिंगदासाची असून तीच आज्ञापत्रकाराने उसनी घेतली, असे म्हणणे योग्य होईल.' गडकोट म्हणजे सैन्याचे बळ' असे 'आज्ञापत्र'कार म्हणतो, तर 'ज्याहाती दुर्ग असे... त्या दळ फार अतीसे' असे विधान 'पंचोपाख्यान'कार करतो. दोन्हीतील साम्य लक्षणीय आहे. 'तस्मात् या कारने, दुर्ग दृढ करने' ही उपसंहार-सदृश अल्पाक्षरी ओवी आणि 'आज्ञापत्र'-कर्त्याची थोडक्यात अधिक सांगणारी वेधक शैली यांतील आत्यंतिक साम्य उपेक्षणीय खास नाही. 'तस्मात् याकारने, दुर्ग दृढ करने' असे म्हणणाऱ्या 'पंचोपाख्यान' काराच्या स्वरात स्वर मिसळून, 'आज्ञापत्र' कर्ताही "याकारणे किल्लेकोट जतन करणे[१७]" असे लिहून जातो, तेव्हा या दोन्ही लेखकांची लेखणी एकच विचार कशा व्यक्तवतात ते. दिसून येते. 'याकारणे' हा शब्द दोघांच्याही लिखाणात आहे. "राज्यलक्षणाचे मुख्य कारण ते किल्ले[१८]" असे म्हणणाऱ्या 'आज्ञापत्र' कर्त्याला

१. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४६.
२. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४५
३. आपस्याची=आपसुकच, आपोआपच
४. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. २३२
५. पंचो.: ३ १७८
६. पंचो.: ३ २५९
७. पंचोपाख्यानः २-३८
८. पंचो.: ३ – १७९
९. पंचो.: ३ –१८२
१०. पंचो.: ३. १६०
११. पंचो.: २–३५
१२. पस्ये १ श
१३. पंचो.: २–३७
१४. = शत्रूस वश होतो; परतंत्र होतो.
१५. पंचो. ३ १८१
१६. पंचो. ३. १८३
१७. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४६
१८. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ५१



अनुक्रमणिका

"दुर्गे नसता मोकळा देश परचक्र येताच निराश्रय, प्रजा भग्न होऊन देश उद्वस होतो[१]" असे सांगावेसे वाटते ते 'दुर्गेवीन जो नृपु। वैस्ये होये, या महालिंगदासाच्या ओवीप्रमाणेच, यात शंका नाही. 'दुर्गपती निर्भय असतात' असे महालिंगदास म्हणतो, तर "जे जे राजे जाले त्यांनी आधी देशामध्ये दुर्गे बांधून देश शाश्वत करून घेतला[२]" असे 'आज्ञापत्र' म्हणते. "आले परचक्र संकट दुर्गाश्रयी परिहार केले[३], ही 'आज्ञापत्रा'ची वाणी तर 'दुर्गाचेनी बळे वैरी वैर करू न सक्ती" ही महालिंगदासाची सांगणी आहे! "गडकोटाचा आश्रय नसता फौजेच्याने टिकाव धरून राहवत नाही[४]" ही 'आज्ञापत्रा'ची माहिती व 'दुर्गेवीन राज्ये करीतु, त्याचे राज्य स्थीर नव्हे', 'जया दुर्ग असे आघट, तया भय कैंचें' ह्या 'पंचोपाख्याना'तील ओळीही साम्यदृष्ट्या ताडून पाहाव्या.

'पंचोपाख्याना'तील वर वर उल्लेखिलेल्या उद्धरणाव्यतिरिक्त आणखी काही जागी महालिंगदासाने दुर्गमहिमा गायिलेला आहे. त्याने लिहिलेल्या "सहस्र जाल गजयत। लक्षें जाले वाजीत। तो भला राज्यनीत। परी दुर्गेवीन राज्ये नाहीं[५]" या साररूप ओवीत व 'संपूर्ण राज्याचे सार ते दुर्गे' (आज्ञापत्र) यात काय फरक आहे? दुर्गावाचून असलेल्या राज्याचे वैय्यर्थ्य महालिंगदासाप्रमाणेच 'आज्ञापत्र' कर्ताही सांगतो-- "गडकोटविरहित जे राज्य, त्या राज्याची स्थिती म्हणजे अभ्रपटलन्याय आहे[६]"

'आज्ञापत्रा'त गडांसंबंधी जशी भारवती व ओघवती भाषा आली आहे, तशीच 'पंचोपाख्याना'तील दुर्गमहती आहे --

> शत धनुर्धर बाहेर। येक असे दुर्गाभीतरी।
> तो इतुक्यांतें आवरी[७]॥

## दुर्ग-व्यवस्था

गडावर सर्व व्यवस्था असावी हा 'आज्ञापत्रा'चा कटाक्ष आहे. 'देशदुर्गादि सैन्याचे बंद नवेच निर्माण करून येकरूप शासन चालविणे[८]' संबंधीची माहिती देणारा 'आज्ञापत्र'कार गडावर धनधान्य व पाणी यांची नीट व्यवस्था असावी असे आवर्जून सांगतो. गडावरील धान्यगृहांची काळजी कशी घ्यावी, त्याच्या सूचना देतो.[९] पाण्याच्या व्यवस्थेविषयी तर तो स्पष्टच सांगतो, "गडावरी आधी उदक पाहून किल्ला बांधावा[१०]." आणखी अशाच सूक्ष्म बाबी तो सांगतो. ह्या सूचनांचे मूळ महालिंगदासाच्या वर्णनात आढळते :--

> तस्मात् याकारनें। दुर्ग दृढ करनें।
> **मध्ये येत्न धनधान्ये आपन। आनी उदक असे[११]॥**

सर्व सामुग्रीनिशी किल्ले सुसज्ज असावेत हा आज्ञापत्राचा कटाक्ष आहे "दुर्गे संग्रामिक सामग्रीरहित जाहली[१२]" याची 'आज्ञापत्रा'ने खंत व्यक्त केली आहे. किल्ल्यावरील सामानादि सज्जतेसंबंधी माहिती देताना 'आज्ञापत्र' म्हणते-- "तमाम किल्लेकोटांची राहिली इमारत नवी चालीस लावून गल्ला दारुगोळा बाण होळे मांडी इ. सामान चढवून संपूर्ण देशदुर्गे सामानपूर केली.[१३]" सामुग्री, दळ-सैन्य यानी परिपूर्ण अशा किल्ल्यातच राहावे. एरवी नसावे असा भाव महालिंगदासाने पुढील ओवीत व्यक्त केला आहे--

> सर्व सामग्री जो पुरुता। दळे सैन्यें जो समर्थु।
> तेंनची असावे दुर्गातु। नाहीतरी नसावे॥[१४]

## किल्ल्याचा प्रमुख

किल्ल्याचा जीव तो हवालदार[१५] असे गौरवोद्गार किल्ल्याच्या प्रमुखासंबंधी 'आज्ञापत्रा'त आहेत हे वाक्य महालिंगदासाच्या पुढील ओवीशी संबंधित वाटते--

---

१. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४५
२. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४५
३. आज्ञापत्र प्र. ८ पृ. ४५
४. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४५-४६
५. पंचोपाख्यानः तंत्र २ ओ. ४०
६. आज्ञापत्रः प्र, ८ पृ. ४५
७. पंचोपाख्यानः तं. २, ओ. ४१
८. आज्ञापत्रः प्र. १ पृ. ५
९. आज्ञापत्रः प्र. ८ पृ. ५३-५४
१०. आज्ञापत्रः प्र. ८ पृ. ५३
११. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १८३
१२. आज्ञापत्रः प्र. १ पृ. ३
१३. आज्ञापत्रः प्र. २, पृ, ८
१४. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. ४७१
१५. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४६



अनुक्रमणिका





(तस्मात् या कारनें । दुर्ग दृढ करने...)
भीतरीया नायेका । मानू दीजे नीका[१] ।।

दुर्गाच्या व्यवस्थेसंबंधी महालिंगदास म्हणतो–

ऐसे असोनी नायेकीं । दुर्ग-नीगा करावी नीकी ।
नीत्यानी फिरवावें देखा । ठाइंतरी पाहावें[२] ।।

'आज्ञापत्रा'त गडाची उस्तवारी करण्यासंबंधी सूचना आहे– "तेथील उस्तवारी व शासन यांत तिळतुल्य अंतर पडों न द्यावे[३]" महालिंगदासही दुर्गाची 'नीगा' 'नीकी' राखण्याबरोबर फिरून व्यवस्थेवर निगराणी ठेवण्याची सूचना देतो. तसेच एका जागी बसून असलो तरी खुद्द चौफेर लक्ष द्यावे असे सुचविले आहे. 'आज्ञापत्रा'त स्वता परामर्ष घ्यावा, कोण्हाचे भरवसियावर गडकोटादि व्यवस्थेचा भाग सोडून देऊ नये इत्यादि सूचना आहेत. 'आज्ञापत्रा'त 'रात्रदिवस चौक्या पहारे नेमून त्याप्रमाणे त्यांची नित्य हजिरी पाहत जावी[४]" अशी जी सूचना आहे तिचे नाते महालिंगदासकृत उक्त ओवीतील वर्णनाशी जुळू शकते.

परचक्राच्या वेळी गडनायकाने मागे हटू नये, गड नेटाने लढवावा असा 'आज्ञापत्रा'चा संकेत आहे. गडास वेढा पडला व गडातील लोक वाचविण्याचा प्रयत्न सफल झाला नाही तर त्याबाबत 'आज्ञापत्र'-कार सुचवितो, "परिच्छिन्न मामलेदारादि लोकी यका करून मरावे ... स्थळ देऊन आपला जीव वाचवावा हे सर्वथा न करावे[५]! 'पंचोपाख्यान'कार दुर्गनायकाच्या बाबतीत म्हणतो -

युद्ध पडलीयां ठाया । टळावें ना सन्मुखीया ।
कदाचीत मृत्ये जालीया । स्वर्ग होये[६] ।।

गडनायकाने अशावेळी मरावे, असे दोन्ही ग्रंथांत सांगितले आहे. 'पंचोपाख्याना'त दुसऱ्या एका जागी म्हटले आहे --

पारकीयाचे कामीं वोडवीजे । आनी तेची जीनें बोलीजे ।
आपुलें पोट कोनें न भरीजे । संसारीचें[७]।।

जुंझता जरी मरीजे । तरी स्वर्गीं सुख भोगीजे ।
अैसेनेंसी वाचीजे । तरी गृह प्राप्त होयें[८] ।।

जुंझतां जरी वाचीजे । तरी लक्ष्मी प्राप्त होइजे ।
मरतां तरी स्वर्ग लाहीजे । सुरांगणां पैं[९]।।

सामान्य सेवकांनीसुद्धा "ऐसें भृत्यें असीजे, स्वामीकाजीं[१०] ।।" "स्वर्गस्वामीं यक योजावें[११] ।। असे 'पंचोपाख्यान' म्हणते, तर 'आज्ञापत्रा'चाही सूर तसाच आहे – "शरीरास्था न पाहतां स्वामिकार्याबरीक्षात्रधर्मे शाश्वत लोकाश्रयित जाहले.[१२] धन्याला प्राणाना दगा होऊ नये[१३] ही भावना गडावरील सेवकांनी वागवावी असे 'आज्ञापत्र' सुचवते. आपणाऐवजी (राजाव्यतिरिक्त) इतर दैवत न जाणता येकरूप निष्ठेने सवकोंनी राहावे[१४], असे सांगणाऱ्या 'आज्ञापत्रा'चे म्हणणे 'स्वर्गस्वामी यक योजावे' या भावनेहून अलग काढता येत नाही. 'यका करून मरावे असे म्हणणारे 'आज्ञापत्र' व स्वामीकार्यी सर्वांनी यावे असे सुचविणारे 'पंचोपाख्यान' तसेच 'शरम धरणारे' म्हणजे ब्रीदाला जागणारे सेवक 'आज्ञापत्राने वाखाणिले[१४] तो भाव, या साऱ्यांची जातकुळी एकच वाटते ! 'दुर्गात न राहावे भिडन,,[१५] असे महालिंगदासाचे मत आहे. तो म्हणतो–

भृत्यें स्वामींचे कार्ये आदरीले ।
तरी स्वामींचें कार्ये फळलें ।
अैसे चांग होये भले । हें प्रभुचें संचीत[१६] ।।

## फितूर आणि हेरगिरी

गडरक्षणाच्या संदर्भात महालिंगदास शत्रूच्या प्रधानाला 'दुर्ग ठावो आपुला दाऊं नये[१७]' असे सांगतो.[१७]

१. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. १८४
२. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. १८५
३. आज्ञापत्रः प्र. ८ पृ. ४६
४. आज्ञापत्र प्र. ३ पृ. २१
५. आज्ञापत्रः प्र. ८ पृ. ५०
६. पंचोपाख्यान प्र. ३, ओ. १८६
७. पंचो. तं. १, ओ. ८६
८. पंचो.: ४. ४८१
९. पंचो. : ४. ५१७
१०. पंचो. : तं. ३, ओ.१८७
११. पंचो.: तं. ३, ओ. १८८
१२. आज्ञापत्र प्र. १, पृ. ३
१३. आज्ञापत्रः प्र. ८ पृ. ४७
१४. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. १६
१५. पंचोपाख्यानः तं. ३, ओ. ४७२
१६. पंचो.: तं. ३, ओ. ६४४
१७. पंचो.: तं. ३, ओ. ५३२










तो म्हणतो–

. अज्ञान जन्हिं जाला वैरदुत ।
त्यासी दाखवीजे दुर्गाचा अंत ।
त्यासी वीस्वासतां घात । असे आपणां[१] ” ॥
याच संदर्भात तो आणखी म्हणतोः–
वैरी अती जुना असीला ।
तो यक वेळे स्वामीने दवडीला ।
त्याचा जरी अंगीकार केला ।
तरी तो जाणावा काळु ॥
तो राष्ट्रभेद करी ।
ऐसे जानावे नीर्धारी ।
म्हणौनी वैरीयाचा भृत्ये अंगीकारी ॥
तो मुर्ख जाणावा [२]॥
राजा अथवा प्रधानुं ।
दुरदृष्टी न घाली अज्ञानु ।
अनुक्रमें न देखे बुधीहीनु । त्याचा राज्यनासु आहे ॥
वैरी–भृत्या सांभाळीजे । त्यासी वीस्वासु नये[३] ॥
वैरीयाचा भृत्य आला । तो जरी आपना सेवक जाला ।
तरी तो नव्हे भला । अपकार्य करी राया ॥
ऐसेंनेंसी जरी राहीजे । तरी त्याचा वीस्वासु न धरीजे[४] ॥
खोटी बुधी उपजे भृत्या । तेवि निमित्ये होये पाहाता ।
वीनाशकाळ उपजतां । वोखटें घडे[५] ॥

‘आज्ञापत्रा’त स्थळास दगा करणारास कडक शासन सुचविले आहे[६]. शत्रूकडे जाऊन परत आलेल्या फितुराचे हाल करावे असा निर्बंध ‘आज्ञापत्र’काराने घातला आहे[७]. हुजरातीच्या संदर्भात लिहिताना ‘आज्ञापत्र’कार म्हणतो – “ एका धण्यापासून हरामखोरी करून आला असेल, ऐसा लोक हुजरातीत येकंदर ठेउच नये; यैसे लोकांचा संग्रह सर्वथैव न करावा– [८]” आज्ञापत्र’काराची निग्रही भाषा व ‘ पंचोपाख्यान ’ ‘ कर्त्याचे ‘ राष्ट्रभेद ’ यासारखे परिस्थितीचे गांभीर्य दर्शविणारे भारदस्त शब्दवेध यांतील परस्पर–औचित्य आणखी विशदून सांगण्याची आवश्यकता नाही. ‘ खोटी बुधी उपजणारे भृत्य ’ महालिंगदासास नको आहेत; तर ‘ नूतन चाकर ठेवणे असल्यास तो लबाड नको ’ असे ‘ आज्ञापत्रा’चे म्हणणे आहे.[९] परकीयाकडील ‘ पाळती ’ नको असेही ‘ आज्ञापत्र ’ सुचवून ठेवते व ‘फितविण्यात येऊ नये[१०]’ असे निक्षून सांगते.

### ‘ स्थानांतरे ’

‘ आज्ञापत्रा’त एक मार्मिक सूचना आहे– “किलियामध्ये मनुष्यें ठेवणे त्यातही तीन वर्षांनी हवालदार काढावा, पांचा वर्षांनी सबनीस काढावा, कारखानीस काढावे. तैसेच सरनोबत, बारगीर हेही जुने नवे करीत जावे. ”[११]

‘ आज्ञापत्रा’तील या मार्मिक सूचनेचे मूळ ‘पंचोपाख्याना’तच आहे. महालिंगदास म्हणतो–

मासोमासी स्थानांतरे । पाळतावी[१२] चातुरे
ऐसे नीगा आदरे । करावी देखा ॥[१३]

### ‘आज्ञापत्रा’ची उसनवारी व कर्ता

वरील प्रदीर्घ साम्यस्थळे पाहिल्यावर काही निश्चित निर्णयावर येणे प्रस्तुत ठरते ‘आज्ञापत्र’ हा ग्रंथ स्वतंत्र व राजनीतीवरील मौलिक स्वरूपाचा आहे, हे मत बदलणे आवश्यक असून ही ‘ राजनीती ’ महालिंगदासाने आधीच मांडून ठेवलेली आहे. राजनीतीची महालिंगदासाने सांगितलेली तत्त्वे ‘आज्ञापत्र’काराने अभ्यासून मांडली. ‘पंचोपाख्याना’त ही तत्त्वे सलग नाहीत. ती विखुरलेली आहेत. ‘ आज्ञापत्र ’ कारानेही ती सलग सांगितलीच असे नाही. एकच विषय अलग अलग जागी तोही मांडतो. पुनरावृत्ती होते. म्हणूनच कै. राजवाडे यानी “ह्यात (आज्ञापत्रात) राजनीतीचे पद्धतशीर व सशास्त्र विवेचन आहे, असे नाही” असे म्हटले असावे.[१४] जो विषय पंचोपाख्यानात सविस्तर आहे, तोच ‘आज्ञा-

१. पंचो.: तं. ३ ओ. ५३३.
२. पंचो.: तं. ३, ओ. ५७२ व ५७३.
३. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. ५७४ व ५७५.
४. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. ६१२ व ६१३.
५. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. ६४९.
६. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४९.
७. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ५०.
८. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. २१
९. आज्ञापत्रः प्र. ३, पृ. २३,
१०. आज्ञापत्रः प्र. २ पृ. २२.
११. आज्ञापत्रः प्र. ८, पृ. ४७–४८.
१२. पालतावीं=पालटावी.
१३. पंचोपाख्यानः तंत्र ३, ओ. १७७.
१४. वि. का. राजवाडे : मराठ्यांच्या इतिहासाचे साधने, खं. ६, प्रस्तावना; पृ. ७५.



अनुक्रमणिका







पत्रा ' तही सविस्तर आहे. महालिंगदासाचा ग्रंथ वाचून, अभ्यासून, त्यातील तत्त्वे संकलित करून घेऊन ' आज्ञापत्र 'काराने ती काहीशी विस्तारून व स्वकालाचा आंशिक भाग जोडून मांडण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. ' आज्ञापत्रा 'तील सर्वत्र प्रकरणात ही उसनवारी आहे. वृत्ती व आरमार ही प्रकरणे मात्र ' आज्ञापत्र ' काराने वेगळी लिहिलेली आहेत. एरवी महालिंगदासाची माहिती ' आज्ञापत्र 'काराने प्रच्छन्नपणे विस्तारून मांडली व थोडीफार नवीन जोडली. नव्या मांडणीत विषयवार शिस्त लावण्याची शिकस्त 'आज्ञापत्र 'काराने केली आहे हे मात्र मान्य !

महालिंगदासाचा ग्रंथ कथांचा असल्यामुळे तो फार मोठा आहे. त्या मानाने ' राजनीती ' लहान आहे. ' आज्ञापत्रा ' त आणखी नवीन सांगावयाचे असल्याचे आश्वासन शेवटी आहे. ' पंचोपाख्यानात आणखी बरीच तत्त्वे आहेत; ती सांगाण्याचा विचार ' आज्ञापत्र ' काराचा असावा.

महालिंगदासाने सांगितलेली तत्त्वे जर ' आज्ञापत्रा 'ने अधिक प्रमाणात स्वीकारली आहेत. तर 'आज्ञापत्र'कार हा फार मोठा लेखक न ठरता सामान्य संकलक ठरतो. आणि एकदा जर तो सामान्य ठरला; तर प्रत्यक्ष श्रीशिवाजीमहाराजाना आज्ञापत्र ' कर्ता मानून त्यांना थिटे करण्यात काय अर्थ आहे ? एवढी मोठी उसनवारी करणारा माणूस श्रीशिवाजी ठरविल्यामुळे शिवाजीराजांच्या व्यक्तित्वाला तडे जातात ' शिवाजींना लहान करावयाचे नसल्यास ' आज्ञापत्रा 'चे कर्तृत्व त्यांच्याकडे देऊ नये, हेच ठीक ! श्रीशिवाजी महाराजांनी ' पंचोपाख्यान ' वाचून त्यातील तत्त्वे संकलित करीत बसण्याचा, त्यांची मांडणी करण्याचा ( व तोही बव्हंश शब्दशः ) खटाटोप केला असेल असे त्यांच्या कार्यव्यग्र जीवनावरून वाटत नाही, पटत नाही. 'शिवाजीमहाराजांव्यतिरिक्त इतरांच्या डोक्यातून ही राजनीती निघूच शकत नाही ' हा प्रा. बनहट्टींचा दावाही खोटा आहे. कारण ही राजनीती शिवाजी महाराजांपूर्वीच दुसऱ्या डोक्यातून निघालेली आहे. अशा स्थितीत श्रीशिवाजीमहाराजांकडे या ग्रंथाचे कर्तृत्व देण्याचा प्रयत्न करणे अत्यंत चुकीचे ठरेल !

ज्या व्यक्तीचे वाचन दांडगे आहे, ज्याने ' पंचोपाख्यान ' अभ्यासले आहे, तोच ' आज्ञापत्रा'चा कर्ता आहे. संपूर्ण ' आज्ञापत्रा'त ' पंचोपाख्याना'चे स्वच्छ प्रतिबिंब आहे; त्यामुळे दोन प्रकरणे एकाने व इतर प्रकरणे दुसऱ्याने लिहिली, हाही आग्रह वरील साम्यावरून तरी चुकीचा ठरेल ! संकलनात्मक शैलीच्या एकाच व्यक्तीने ' आज्ञापत्र ' लिहिले आहे. जुने घेण्याची हौस असलेल्या व्यक्तीने हा ग्रंथ लिहिला आहे, हे स्पष्ट आहे. " उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी[1] " या वचनाचा संदर्भ आज्ञापत्रात आहे व हा श्लोक सुंदर अनुवादासह ' पंचोपाख्याना'त आलेला आहे—

उदीमें पुरुषासी धनं होये । लक्ष्मी दैव मान करू जाय ।
उगलेची बैसले न होये । भला लाभु[2] ।।

अशा उल्लेखांची हौस या दोन्ही ग्रंथलेखकांना आहे. ' आज्ञापत्र'कार असा हा संकलनप्रेमी गृहस्थ आहे. असे ज्याला साधते. तो ' आज्ञापत्र'कर्ता आहे. ' आज्ञापत्र ' लौकिकाइतके मौलिक व स्वतंत्र नाही हे सत्य असून त्यामुळेच त्याचे कर्ते शिवाजीराजे ठरू शकत नाहीत !

---

१. ' आज्ञापत्रा' तील उल्लेखः प्र. २, पृ. २५.
२. पंचोपाख्यानः तंत्र २, ओ. ४७२.






डॉ. नी. र. वऱ्हाडपांडे

# ऋग्वेदातील आर्य व दस्यु

## " नामूलं लिख्यते किञ्चित् "

" आर्य " नावाच्या एका वंशाने भारतावर आक्रमण केले व येथल्या " आदिवासींचा " वंशच्छेद करून येथे वसती केली असे शाळेत पाय ठेवल्यापासून आम्हाला शिकवण्यात येते. संस्कृत वाङ्मयाचे अध्ययन करू लागल्यापासून ही एक गप्प आहे अशी मला शंका येऊ लागली. पुढे वेदातील यासंबंधीचे तथाकथित उल्लेख तपासून पाहता ती शंका ही शंकाच न राहता निश्चितार्थ झाली. पाश्चात्य संशोधकाची प्रतिष्ठा व लहानपणापासूनचे संस्कार यांचा मनावर परिणाम न होऊ देता वाचक इतिहासाच्या मूळ स्रोतांचे अध्ययन करतील तर त्यांचे देखील माझ्यासारखेच मत झाल्याशिवाय राहणार नाही अशी मला खात्री आहे. म्हणून मूळ ऋग्वेदात यासंबंधी काय आहे याची चर्चा करीत आहे.

## चार वर्ण म्हणजे चार वंश !

ऋग्वेदात आर्य हा शब्द एकूण ४० वेळा आलेला आहे. यापैकी एकाही ठिकाणी आनुवंशिक शारीरविशेषांनी युक्त अशा एखाद्या वंशाचा वाचक म्हणून तो वापरलेला नाही. श्री. देशमुखांनी आर्य वर्ण म्हणजे आर्य वंश असा अर्थ स्वीकारला आहे. ( नवभारत ८–६४ ) असा अर्थ केल्यास ब्राह्मण वर्ण म्हणजे ब्राह्मण वंश व क्षत्रिय वर्ण म्हणजे क्षत्रिय वंश असे अर्थ करावे लागतील. कधी कधी तर आर्य या संज्ञेतून ब्राह्मण व क्षत्रिय हे देखील वगळले जाऊन केवळ वैश्य वर्णाचा वाचक म्हणून तो शब्द वेदवाङ्मयात वापरलेला आहे. ( वैदिक इंडेक्स ) ब्राह्मण व क्षत्रियापेक्षा वैश्य हे अधिक शुद्ध रक्ताचे आर्य होते, असा वंशवाद्यांचा शोध असल्यास न कळे.

आर्य शब्द वंशाचा द्योतक म्हणून ऋग्वेदात वापरला गेला नाही एवढेच नव्हे तर तो वंशाचा वाचक होऊच शकत नाही असे काही उल्लेखावरून स्पष्ट दिसते. "आ संयतमिन्द्रण: स्वस्ति शत्रुतूर्याय बृहतीमृध्राम्, यया दासान्यार्याणि वृत्रा करो वज्रिन् सुतुका नाहुषाणि " ( ६–२२–१० ) हे इन्द्रा, आम्हाला अशी संपदा दे की जिच्या योगाने दास आर्य होतील व सर्व मानवी शत्रु मारले जातील. " या प्रार्थनेत दास आर्य व्हावेत ही इच्छा व्यक्तविली आहे. आर्य हा जर एक वंश असता तर दास आर्य होणे शक्य नव्हते. कारण कुणालाही आपला वंश बदलता येत नाही.

## काजळी दस्यु व कोळशी आर्य

ऋग्वेदामध्ये " स वृत्रहा इन्द्रः कृष्णयोनीः पुरन्दरो दासीरैरयद्वि ' ( २–२०–७ ) "त्वचं कृष्णामरन्धयत् " ( १–३०–८ ) वगैरे वचने आली आहेत. त्यावरून आर्यांचे शत्रु जे दस्यु ते काळे होते व गर्भितार्थाने आर्य गोरे होते असें अनुमान वंशवाद्यानी काढलेले आहे. पण अशा गर्भितार्थाच्या मागे लागण्याचे काहीही कारण नाही. आर्य देखील काळे असत, असे अनेक उल्लेख ऋग्वेदात आहेत. " उत कण्वं नृषद : पुत्रमाहुरुत श्यावो धनमादत्त वाजी, प्र कृष्णाय रुशदपिन्वतो धर्ऋतमत्र नकिरस्मा अपीपेत्, ( १०–३१–११ ) " " कण्व हा नृषदाचा पुत्र होता. तो श्याव ( म्हणजे सायणाचार्यांच्या मते श्याम ) होता व त्याने अग्नीच्या कृपेने धन संपादन केले. अग्नीने त्या काळचा ( कृष्ण ) कण्वाला कान्तिमान् रूप दिले, अग्नीशिवाय दुसरे कुणीही त्याला संबंधित केले नाही " यात कण्व ऋषि काळा होता असे स्वच्छ म्हटलेले आहे. कण्वानी ऋग्वेदाच्या आठव्या मंडळातील बहुतेक ऋचा रचल्या. एक कण्व शुक्ल यजुर्वेदाच्या एका शाखेचा प्रमुख आचार्य होता. तेव्हा वरील ऋचेतला कण्व दस्यु होता असे म्हणायची सोय नाही. तो शंभरनंबरी आर्य होता आणि तरीही काळा होता एवढेच नव्हे तर ऋचाकाराला त्याच्या काळेपणाबद्दल यत्किंचितही वैषम्य वाटत नाही. त्याच्या कृष्णवर्णाचा तो कौतुकाने उल्लेख करीत आहे. " अयं वां कृष्णो अश्विना हवते वाजिनीवसू " ( ८–८५–३ ). यात स्तोत्रकाराचे नाव कृष्ण असल्याचा उल्लेख आहे. कृष्ण हे नाव मुळात वर्णावरूनच पडले असले पाहिजे. " अवस्यते स्तुवते कृष्णियाय. "यातील स्तोत्रकार कृष्णाचा पुत्र आहे. " कृष्णयोनीः दासीः " एवढयावरून दास ही एक



अनुक्रमणिका






काळी जमात होती, असे मानायचे तर कृष्णिय ऋषि काळा होता असे मानायला काहीच हरकत नाही.

**उपटसुंभ " नॉर्डिक टाइप "**

आर्य हा एक गौर वर्णीय वंश नव्हता, एवढेच नव्हे तर वैदिक आर्यांना गोऱ्या वर्णाबद्दल फारसे आकर्षणही नव्हते असे दाखवणारे अनेक उल्लेख ऋग्वेदात आहेत. " पिशङ्ग रूप: सुभरो वयोधाः श्रुष्टी वीरो जायते देवकामः. ( २-३-९ ) यात आमची मुले पिशङ्ग वर्णाची होवोत अशी प्रार्थना आहे. पिशङ्ग म्हणजे गोरा नव्हे. लालसर तपकिरी रंगास पिशंग म्हणतात. बदाम, काळवंडलेला वेत, किंवा अति वाळलेले गवत पिशङ्ग वर्णाचे असते. हा वर्ण सावळयातच मोडणारा आहे. आपला वर्ण पिशङ्ग व्हावा अशी इच्छा वरील ऋचेत व्यक्तविली आहे. यावरून सर्वच आर्य हमखास पिशङ्ग नव्हते असेही सिद्ध होते. तसे असते तर पिशंगवर्णासाठी प्रार्थना करण्याची गरज पडली नसती.

पिशङ्ग नसलेल्या आर्यांत वसिष्ठांचा समावेश होतो. " श्वित्यञ्चो मा दक्षिणतस्कपर्दाः " ( ७–३३–१ ) या ऋचेत वसिष्ठ गोरे होते असे सांगितले आहे. वसिष्ठ गोरे होते असे मुद्दाम सांगावे लागले यावरून सर्वच आर्य गोरे नव्हते हे सिद्ध होते.

तात्पर्य वैदिक आर्य सध्याच्या भारतीयाप्रमाणेच काळे, पिशंग, गोरे वगैरे अनेक वर्णांचे होते. ते श्वेतवर्णीय वंशाचे होते असे म्हणणे ही एक लोणकढी थाप आहे.

वर्णाप्रमाणेच नाकडोळे, केस, बांधा वगैरे कोणत्याच बाबतीत वैदिक आर्यांचे पृथगात्मक वर्णन ऋग्वेदात सापडत नाही. ते " नार्डिक टाइप"चे होते हा त्यांच्यावर मिथ्या आरोप आहे व हजारो वर्षापूर्वीची प्रेते तपासून ती आर्यांची की अनार्यांची हे ठरवू पाहणे ही अप्रयोजकपणाची परिसीमा आहे. ( देशमुख, नवभारत ८–६४ )

**गोऱ्या व तांबड्या फौजा :**

आर्य हा एक वंश नव्हता, हे दाखवल्यावर आर्यांचे शत्रु जे दस्यु वा दास ते कोण होते, याची आता चर्चा केली पाहिजे.

सायणाचार्यांच्या मते दसु उपक्षये ( नुकसान पोहचवणे ) या धातूपासून दस्यु वा दास हे शब्द निष्पन्न झाले आहेत. अर्थात दस्यु म्हणजे उपद्रव करणारा.

हे दस्यु काळे होते, असा पाश्चात्य संशोधकांचा " शोध " मागे उल्लेखिलेला आहे. पण त्याला ऋग्वेदात आधार नाही. " दासं वर्णमधरं गुहाकः " ( २–१२–४ ) याचा अर्थ मॅकडोनेलने दासांचा रंग म्हणजे काळा वंश इन्द्राने बुडविला असा केला आहे. असे अर्थ केल्यास " वर्णानां ब्राह्मणो गुरुः " म्हणजे रंगामध्ये ब्राह्मण श्रेष्ठ आहेत, व " चातुर्वर्ण्यं मया सृष्टं " म्हणजे मी चार रंग निर्माण केले असे तारे तोडण्यास काहीच प्रत्यवाय नाही. वर्ण म्हणजे विशिष्ट कर्म करणारे लोक असा अर्थ हजारो वर्षापासून रूढ आहे. त्याच अनुरोधाने दासवर्णाची उपपत्ती लावली पाहिजे हे वंशवादाने न पछाडलेल्या कोणत्याही वाचकास स्पष्ट दिसू शकेल.

" दासं वर्णम् " या वचनाव्यतिरिक्त " कृष्णयोनीः दासीः " व " त्वचं कृष्णामरन्धयत् " ही वचने दस्यु काळे होते, हे दाखवण्यासाठी नेहमी वापरण्यात येत असतात. पण यावरून कृष्ण नावाचा एक दस्यु व त्याचे बांधव काळे होते एवढाच अर्थ निष्पन्न होतो. सर्वच दस्यु काळे होते असे त्यावरून मुळीच सिद्ध होत नाही. पं. नेहरू गोरे होते यावरून भारतीय गोऱ्या वंशाचे ठरत नाहीत. शिवाय राजाच्या वर्णाने त्याच्या सगळयाच पक्षाचा उल्लेख करण्याची चाल आहे. शिवभारतात मोगल सैन्याला " ताम्राननमयी पताकिनी " म्हटले आहे. पण त्या सैन्यात काळे राजपूत, गोरे पठाण वगैरे सर्वच " वर्णां"चा समावेश होत होता. ईस्ट इंडिया कंपनीच्या फौजांचा उल्लेख गोऱ्या फौजा म्हणून होत असे. पण त्यात उत्तर प्रदेशातील काळ्या ब्राह्मणांची संख्या फार मोठी होती. त्याचप्रमाणे कृष्ण नावाचा दस्यु स्वत: काळा असल्यामुळे त्याच्या पक्षाच्या लोकांना काळे असा शब्द लागू शकतो. यावरून दस्यु हा एकजात काळ्या वर्णाच्या लोकांचा एक वंश होता असे सिद्ध होत नाही.



अनुक्रमणिका

## नकटे की भटके

वर्णाव्यतिरिक्त दस्यूंचे नाक चपटे असे व या उलट आर्यांचे नाक धरधरीत असे, असे एक अनुमान "अनासोदस्यून् मृणः" या वचनातील "अनासः" या शब्दाचा विननाकाचे म्हणजे चपटचा नाकाचे असा अर्थ करून करण्यात आलेला आहे. त्याविरुद्धही वरीलच युक्तिवाद लागू होतो. दस्यूंचे एखादे कुटुंब चपटचा नाकाचे असले तरी सारे दस्यु चपटचा नाकाऱ्या वंशात घालता येणार नाहीत. काही दस्यु काळे होते तसेच काही आर्यही काळे होते हे वर दाखवलेच आहे. त्याचप्रमाणे काही दस्यु अनास असले तर काही आर्यही अनास असतील.

शिवाय अनास या शब्दाचा चपटचा नाकाचे असा अर्थ करणे बरोबर वाटत वाटत नाही. सायणाचार्यांनी त्याचा आस्यरहित म्हणजे मुखहीन किंवा मुके असा अर्थ केला आहे. तो पुढील मृध्रवाचः म्हणजे ज्याची वाणी हिंसित झालेली आहे या विशेषणाने समर्थनीय वाटतो. या दस्यूंची वाणी शापामुळे वा अन्य दुर्घटनेमुळे छिन्न झाली होती अशी एखादी कथा या मागे असण्याचा संभव आहे.

आचार्य गिरीशचन्द्र अवस्थी यांनी अनासः म्हणजे एका ठिकाणी न राहणारे, भटके, असा अर्थ केला आहे. त्यांच्या मते अन्+आस् या पदच्छेदात आस् उपवेशने ( बसणे ) असा धातु आहे. हा अर्थ देखील चपटचा नाकाचे यापेक्षा व्याकरणदृष्टचा अधिक सयुक्तिक वाटतो. दस्यु हे मानव नसून भूतपिशाचाप्रमाणे सदा भ्रमन्ती करणारी ती एखादी योनि असावी असे पुढील विवेचनावरून दिसून येईल. या दृष्टीने दस्यूनां अनास् म्हणणे तर्कसंगत आहे.

## दस्यु भारताचे रहिवासी कशावरून ?

दस्यूंच्या वर्णनात अव्रत, अन्यव्रत, अयज्वानः, अकर्मन्, अदेवयु, अब्रह्न्, देवपीयु हे शब्द वारंवार येतात. यावरून ते आर्यांना मान्य असणारी व्रते न आचरणारे, यज्ञ करणारे, देवाबद्दल उदासीन, देवस्तुति न करता उलट देवनिन्दा करणारे होते हे स्पष्ट आहे. हे सर्व भेद धार्मिक आहेत. वंश व संस्कृति यांनी एक असून देखील पाखंड मांडणाऱ्या लोकांचे वर्णन अशा तऱ्हेने होऊ शकते.

दस्यु हा एक आर्येतर "आदिवासी" वंश होता असे सिद्ध होण्यास दस्यूंच्या पृथगात्मक शरीर विशेषाप्रमाणेच त्यांची भाषा संस्कृताहून सर्वस्वी भिन्न होती व ते भारताचे रहिवासी होते, हे सिद्ध व्हायला पाहिजे. ऋग्वेदातच काय जगातल्या कुठल्याही प्राचीन वाङमयात असे सुचवणारे उल्लेख सापडलेले नाहीत. आर्य हे जर विदेशी आक्रमक असते तर त्यांनी दस्यूंना तुच्छतापूर्वक ( एतद्देशीय-नेटिव ) म्हणून संबोधले असते. पण ऋग्वेदात दस्यूंचे अशा शब्दांनी वर्णन कोठेही नाही. आर्यांचे "ऋषि" हे रूसी म्हणजे रशियन होते. यावरून आर्य हे विदेशी होते, असा एक महान शोध नुकताच वाचण्यात आला. विनोदाचा प्रयत्न म्हणून हे तर्कट क्षम्य असले तरी "इंडलजीला" ते एक मोठे "व्हॅल्यूएबल कॉण्ट्रीब्यूशन" आहे म्हणून चिकित्सक वाचकांनी या तर्कटाच्या जनकाचे "स्पेशल आभार' मानावेत अशी अपेक्षा करणे हा मोठाच गहजब आहे.

दस्यु हे भारतीय होते, याला पुरावा नाही. उलट ते "अनास्" म्हणजे भटके असतील तर त्यांच्या रानटी टोळयांनींच परदेशातून भारतावर आक्रमण केले व **आदिवासी आर्यांनी** त्याचा फडशा पाडून भारताचे रक्षण केले, असे का म्हणू नये ?

मी असे म्हणत नाही, याचे कारण असे :–

## दस्यु इंद्राच्या तोडीचे होते

दस्यूंच्या उल्लेखातील सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे ते इंद्राचे शत्रु होते. दस्यूंच्या नाशाचे कार्य बहुधा इंद्र करतो. मानवाचे प्रतिस्पर्धी म्हणून दस्यूंच्या उल्लेख क्वचितच येतो. इंद्र हा कोणी ऐतिहासिक पुरुष होता अशी ऋचाकारांची समजूत नव्हती. तो पर्जन्याचा देव होता. अवर्षण वा अंधकार याच्यावर विजय मिळवून तो पाणी व प्रकाश यांची मुक्तता करीत असे. पाण्याला अडवून ठेवणारे मेघ वा हिम ही जणू "पुरे" होती व त्यांचा तो वारंवार भेद करी. ( हा अर्थ आर्यांच्या स्वारीचा प्रपंच मांडणाऱ्या मॅकडोनललाही मान्य








आहे. अर्थात् ऋग्वेदातील पुरांच्या उल्लेखावरून मोहेंजोदारो व हरप्पा या पुरांचा इतिहास रचता येणार नाही.

'इंद्र हा मानव होता व त्याने पुरे फोडली' असे मूर्खपणाचे विधान मी केले नाही असे म्हणत श्री. देशमुखांनी अभ्यावर्ती चायमानाने हरियूपीया शहराचा नाश केला, असे ठोकून दिले आहे. (नवभारत ८–६४) पण मूळ ऋचेप्रमाणे हरियूपीयाचा पराक्रम अभ्यावर्ती चायमानाने केलेला नसून इंद्रानेच केलेला आहे. मूळ ऋचा अशी आहे.

वधीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षत् ।
वृचीवतो यद्धरियूपीयायां हन्पूर्वे अर्धे भियसापरो दत् ६–२७–५

अभ्यावर्ती चायमाना प्रीत्यर्थं **इंद्राने** वरशिखाच्या पुत्रांना मारले. हरियूपीयाच्या एका भागी इंद्राने वरशिखाच्या पुत्रांना मारले तेव्हा दुसऱ्या भागी त्याचे पुत्र भीतीनेच दीर्ण झाले, असा या ऋचेचा सायणकृत अर्थ आहे.

## इंद्राचा महिमा

इंद्र हा उषा व सूर्य यांचा निर्माता आहे. त्याने पर्वतांना स्थिर केले. पृथ्वी व आकाश या दोन चाकांच्या मध्ये तो आसाप्रमाणे नांदतो. दोन टोकाना धरून एखादे रबर ताणावे त्याप्रमाणे तो पृथ्वी व आकाश ही दोन टोके धरून विश्वाला ताणतो. इंद्र हा याप्रमाणे केवळ अतिमानवीच नव्हे तर अतिनैसर्गिक देखील होता. अर्थात् दस्यूना मारणे हे त्याचे कृत्य देखील विश्वाला ताणण्याच्या कृत्याप्रमाणेच एक अतिमानवी अद्भुत कृत्य होते.

दस्यूंना मारणे हे अतिमानवी कृत्य होते, कारण दस्यू हे स्वतःच अतिमानव होते. " मनवे शासदव्रतान् " ( १–१३०–८ ) यात अव्रत दस्यु व मानव असा वेगळा उल्लेख आहे. तसेच " येभिर्निं दस्युं मनुषो निघोषयो ( खिल. अ. ३–२–८ ) यात देखील दस्यु व मानव एक नाहीत हे सूचित केले आहे. आर्यांच्या स्वारीने ग्रासलेले मॅक्डोनेल व कीथ यांना देखील दस्यु ही अतिमानवी योनि होती हे कबूल करावे लागले आहे. ( Dasyu ... in many passages in the Rigved ... is clearly applied to super human enemies " Vedic Index )

असे जर आहे तर या अतिमानवी दस्यूंशी मानव आर्यांची गाठ पडल्याचे जेथे उल्लेख आहेत, त्या ऋचांची उपपति कशी लावायची ?

## दस्यु, चेटकिणी व चकवे

ही उपपत्ति लावण्यास ऋग्वेदातीलच काही निर्णायक उल्लेखांचे साहाय्य होते. "विजानीह्यार्यान्ये च दस्यवो, बर्हिष्मते रन्धया शासदव्रतान् ". ( १–५१–८ ). या ऋचेत "हे इंद्रा, आर्य, कोणते व दस्यु कोणते, हे बरोबर ओळखून दस्यूंना शासन कर, अशी इंद्राची विनवणी केली आहे. " अयमेमि, विचाकशदचिन्वन् दासमार्यम् " १०–८६–१९ या ऋचेत आर्य व दास यांना वेगळे ओळखून मी यज्ञास जातो, असे इंद्र म्हणत आहे. या उल्लेखावरून दस्यु, दास व आर्य यांना पाहिल्याबरोबर वेगळे ओळखणे हे इंद्रासारख्यालाही सहज शक्य नव्हते असे स्पष्ट दिसते. अमेरिकेत गोरा कोणता व नीग्रो कोणता हे ओळखण्यास कुणालाच अडचण पडत नाही. आर्य व दास हे जर युरोपीय व नीग्रो यांच्यासारखे वेगळे वंश असते तर वरील ऋचांना काही अर्थच राहिला नसता. तेव्हा दस्यु दास व आर्य हे सहज ओळखता न येण्याइतके शरीराने व संस्कृतीने एकरूप होते असे मानावे लागते.

मग या दस्यूंवर आर्यांचा एवढा राग का ?

याचेही कारण स्पष्ट आहे. ते आर्यांच्या यज्ञकर्माचे विरोधी होते व त्यात आपल्या गूढ शक्तीने वा जादूटोण्याने ते बाधा आणत असत. जुन्या काळी इंद्राने ज्यांच्याशी लढाई केली, ते दस्यूच आर्यांचे स्वरूप धारण करून छद्माने वावरतात व नकळत यज्ञकर्मांचा विध्वंस करतात अशी आर्यांची समजूत होती. चेटकिणी या वेगळ्या वंशाच्या व संस्कृतीच्या स्त्रिया नसतात. आपल्याच समाजातील काही स्त्रियांना चेटुक करण्याचे सामर्थ्य असते ही ज्याप्रमाणे चेटकिणीबद्दल समजूत होती, त्याचप्रमाणे आर्यांची दस्यूंबद्दल समजूत असावी.










अनुक्रमणिका

डॉ. के. वा. आपटे

# ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ।

भगवद्गीतेच्या चौथ्या अध्यायात चोवीस ते तीस या श्लोकात भगवान् श्रीकृष्णाने अनेक यज्ञांचा निर्देश केलेला आहे, आणि यज्ञांतील शेष सेवन करणारे लोक सनातन अशा[1] ब्रह्माप्रत जातात. असे आश्वासनही कृष्णाने देऊन ठेवले आहे. याच संदर्भात कृष्णाने ज्ञानयज्ञाचा उल्लेख केलेला आहे. कृष्णाचे मते, द्रव्य-यज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ[2] श्रेयस्कर आहे. आणि याच स्थळी ज्ञानाचे महत्त्व सांगताना श्रीकृष्णाने म्हटले आहे : ज्ञानरूपी नौकेच्या साहाय्याने पापरूपी सागर[3] ओलांडून जाता येतो. ज्ञान प्राप्त झाल्यावर श्रेष्ठ प्रकारची[4] शांति म्हणजे मुक्ति प्राप्त होते. उत्तरोक्त ( the latter ) गोष्टीचे कारण असे आहे की ज्ञानाच्या योगाने कर्मांचा नाश होतो. जसा प्रदीप्त झालेला अग्नि सर्पण भस्मसात् करतो. त्याप्रमाणे ज्ञानाग्नि हा[5] कर्मे भस्मसात् करतो. येथे " ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा " या चरणात भगवद्गीतेला काय सांगायचे आहे, याची अधिक चर्चा प्रस्तुत लेखात केली आहे.

## ज्ञानरूपी अग्नी आणि कर्मवाद

या चरणात ज्ञानरूपी अग्नि किंवा ज्ञान हाच अग्नि अशी रूपकात्मक किंवा आलंकारिक भाषा आहे. साहजिकच ज्ञानाच्या अग्नीने शेकोटीप्रमाणे थंडीपासून निवारण होत नाही की अन्न शिजवण्याचे कार्य होत नाही; किंवा ज्ञानाने दग्ध झालेल्या कर्मांची राख हुडकून काढून ती अंगास फासताही येत नाही. तेव्हा ज्ञानाग्नि हा शब्द आलंकारिक अर्थाने घेतल्यावर आपणास पुढील अर्थाची प्राप्ति होते:- सर्पण भस्मसात् करून पुनर्ज्वलनाच्या कामी निरुपयोगी करण्याचे सामर्थ्य जसे अग्नीत आहे, तसे कर्मांना निष्प्रभ, निरुपयोगी ( =अबंधनकारक ) करण्याचे सामर्थ्य ज्ञानात आहे. आणि जळून गेलेले-भस्मसात् झालेले-इंधन ज्याप्रमाणे पुनः ज्वलनाच्या कामी उपयोगी पडू शकत नाही, त्याप्रमाणेच ज्ञानरूपी अग्नीच्या क्रियेने जळलेली-निष्प्रभ वा निःशक्त झालेली-कर्मे माणसाला पुनः बंधनकारक होऊ शकत नाहीत. हा भाग नीट लक्षात येण्यास भारतीय तत्त्वज्ञानातील कर्मवाद थोडक्यात जाणून घेतला पाहिजे.

भारतीय तत्त्वज्ञानात कर्मवादाला[6] एक अनन्यसाधारण महत्त्व आहे. प्राण्याने केलेले कर्म हे काहीतरी फळ देतेच. आता, हे फळ मिळण्यास जो अवधी लागतो, त्यावरून कर्माचे पुढील प्रकार सांगता येतात- व्यक्तीच्या जीवनात, ( १ ) काही कर्मे तत्काळ फळ देतात; उदा. आगीत हात घातला की हात भाजतो; ( २ ) काही कर्मे काही काळानंतर, पण मृत्यूपूर्वी फळ देतात; उदा. - आज लावलेल्या झाडाचे फळ काही वर्षांनी प्राप्त होते; ( ३ ) पण काही कर्मे अशी आहेत की त्यांची फळे चालू जन्मात न मिळता मरणोत्तर- म्हणजे पुढील जीवनात मिळतात. उदा- पौराणिकांचे कल्पनेप्रमाणे स्वर्ग, नरक, इ. या अन्त्योक्त ( the latter ) वचनावर भारतीय तत्त्वज्ञानातील

---

१. यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् । ४.३१
२. श्रेयान् द्रव्यमयाद् यज्ञाद् ज्ञानयज्ञः परंतप । ४.३३
३. सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि । ४.३६
४. ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति । ४.३९
५. यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ॥ ४.३७
६. या कर्मवादाने भारतीय लोक निष्क्रिय बनले असा जो एक प्रवाद आहे. तो खरा कसा नाही, ही चर्चा प्रस्तुत स्थळी अस्थानी आहे.











अनुक्रमणिका

पुनर्जन्माची उपपत्ती आधारलेली आहे. ज्या कर्माचे फळ कर्त्याला या जन्मात मिळालेले नाही त्याचे फळ भोगण्यास त्याला पुनः जन्म घ्यावा लागतो. कारण कर्माचे फळ भोगून संपल्याशिवाय कर्मांचा[७] नाश होत नाही. थोडक्यात सांगायचे झाल्यास, कर्म, त्याच्या फळाचा भोग, त्यासाठी नवीन जन्म, पुनः मरण, याप्रमाणे कर्मबंध म्हणजे जन्ममरणाचे चक्र चालूच रहाते. पण जर का कर्मांचा नाश झाला तर मात्र कर्मबंध तुटून मोक्ष प्राप्त होतो. हा कर्मबंध तोडण्यासाठी अनेक उपाय भारतीय तत्त्वज्ञानाने सांगितलेले आहेत. त्यापैकी ज्ञान हा एक उपाय आहे. ज्ञानाने कर्मांचा नाश होऊन[८] मुक्ती प्राप्त होते. आणि म्हणूनच "ज्ञानाद् मोक्षः" असे उपनिषदांनी सांगून ठेवलेले आहे.

ज्ञानाने कर्मनाश होतो– कर्मे भस्मसात् होतात–, या बाबतीत भगवद्गीतेचे म्हणणे असे आहे की ज्ञानाने सर्व कर्मे भस्मसात् होतात. पण भगवद्गीतेचे हे म्हणणे मात्र संपूर्ण सत्य नाही. तथापि हे विधान स्पष्ट करून सांगण्यापूर्वी येथेच हे सांगितले पाहिजे की भगवद्गीतेतील अनेक सामान्य विधाने ( general statements ) ही आंशिक सत्ये ( partial truths ) किंवा[९] अर्ध-सत्ये आहेत.

ज्ञानाने सर्व कर्मांचा नाश होतो, हे आंशिक सत्य आहे, कारण ज्ञानाने काही कर्मांचाच नाश होतो. या विधानाचे अधिक स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे :– आणखी एका दृष्टिकोनातून पाहिल्यास, कर्मांचे तीन विभाग पडतात. ते म्हणजे संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण कर्म. अनेक पूर्व जन्मात केलेल्या कर्मांचा जो संचय साचून राहिला आहे आणि ज्याचा अद्यापि उपभोग घेतला गेलेला नाही, त्याला संचित कर्म म्हणतात. संचित कर्मातील जो कर्मांचा भाग किंवा वाटा चालू–वर्तमान– जीवनात जीवाने भोगण्यास घेतला आहे, त्याला प्रारब्ध कर्म म्हणतात. आणि वर्तमान जीवनात मनुष्य जे कर्म करीत आहे, त्याला क्रियमाण कर्म म्हणतात. हा भाग आधुनिक काळातील उदाहरण घेऊन पुढीलप्रमाणे अधिक स्पष्ट करून सांगता येईल:– अनेक वर्षे काबाडकष्ट करून ( किंवा क्वचित् न करता ) साठविलेली पैशाची पुंजी जर बँकेत ठेव म्हणून ठेवली असेल तर ती संचित कर्म सदृश आहे. या ठेवीतले जितके द्रव्य सध्या चालू खर्चासाठी काढले असेल, ते द्रव्य प्रारब्ध कर्माशी सदृश आहे. आणि सध्या जी संपत्ति मिळविली जात आहे, ती क्रियमाण कर्म सदृश आहे.

ज्ञानाने केवळ द्विविध कर्मांचा नाश होतो. ज्ञानाचे योगे संचित आणि क्रियमाण कर्मांचा नाश होतो; ज्ञानाने ही दोन प्रकारची कर्मे माणसाला बंधनकारक ठरत नाही येथे हे आवर्जून लक्षात ठेवले पाहिजे की ज्ञानाने प्रारब्ध कर्मांचा नाश होत नाही. प्रारब्ध कर्म हे भोगूनच संपणार आहे आणि ते तसेच संपविले पाहिजे; ते चुकविता येत नाही. म्हणजेच, प्रारब्ध कर्मानुसार वर्तमान जीवन असल्याने, वर्तमान जीवन संपेपर्यंत प्रारब्ध कर्माची फळे भोगावीच लागतात. या दृष्टीने भारतीय तत्त्वज्ञानातील जीवन्मुक्ताची कल्पना अत्यंत महत्वाची आहे. जर ज्ञानाने सर्वच कर्मांचा नाश झाला असता तर ज्ञानाने मोक्ष मिळविणारा माणूस तत्काळ मरून पडला असता. पण असा प्रकार होत नाही, असे भारताचे तात्त्विक वाङ्मय सांगते. मुक्तीवरील भक्ति, इत्यादि कल्पना हीच गोष्ट स्पष्ट करून सांगतात. चालू देहाचा अंत हा प्रारब्ध कर्माचे हाती आहे. त्या प्रारब्धाचा नाश भोगूनच होणार आहे. त्या प्रारब्ध कर्माचा नाश ज्ञानाने होत नाही. आणि ही वस्तुस्थिति भगवद्गीतेलाही मान्य आहे, हे जीवन्मुक्त ज्ञान्याचे जे वर्णन भगवद्गीतेने ५ · १६ · २८ मध्ये केले आहे, त्यावरून उघड होते.

---

७. नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि ।

८. ज्ञानाने कर्मांचा नाश कसा होतो, या प्रश्नाचा विचार प्रस्तुत लेखात करण्याची आवश्यकता नाही.

९. उदा– नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः । ( ७·२५ ) ; मां तु वेद न कश्चन ( ७·२६ ); यद्यदाचरतिश्रेष्ठस्तत्तदेवेतरोजनः ( ३·२१ ) ( – या चरणाच्या चर्चेसाठी जीवनविकास, जुलै १९६२ पहा ) ; सर्वभूतहिते रताः ( ५·२५ ) ( – या वाक्यांशाच्या चर्चेसाठी Altruism in the Bhagavadgita, Bombay College Magazine, 1960 पहा ).



अनुक्रमणिका

## कोणत्या प्रकारच्या ज्ञानाने कर्मनाश होतो?

आता कोणत्या ज्ञानाने संचित आणि क्रियमाण कर्मांचा नाश होतो, असा प्रश्न उपस्थित होईल. त्याचे उत्तर असेः– विद्यालये, महाविद्यालये, विश्वविद्यालये इत्यादि ज्ञानांच्या पीठांतून किंवा संस्थातून जे ज्ञान-दान आणि ज्ञानग्रहण होते, तसल्याप्रकारच्या ज्ञानाने कर्मांचा नाश होत नाही; हा ज्ञान–कोश कर्मनाशक नाही. उलट ज्ञान–वृद्धीने कर्मबंध वाढण्याची शक्यताच जास्त आहे; कारण ज्ञानाचा गर्व अथवा अहंकार आला की कर्मबंध[10] दृढतर होऊ लागतो. ज्या ज्ञानाने कर्माचा नाश होतो, ते ज्ञान म्हणजे सत्तत्त्वाचे ( reality ) किंवा अंतिमतत्त्वाचे ( ultimate reality ) होय. ईश्वर (=कृष्ण) हे सत्तत्त्व मानल्यास हे ज्ञान ईश्वरविषयक[11] असेल. या ईश्वरविषयक ज्ञानाने अशुभ अशा संसारातून[12] सुटका होते. ईश्वराला जाणून साधकाला[13] शांति प्राप्त होते. आत्मा अथवा ब्रह्म सत्तत्त्व मानल्यास हे ज्ञान[14] त्याबद्दल असू शकते. ज्ञेय ब्रह्म जाणून अमृतत्वाची[15] म्हणजे मोक्षाची प्राप्ति होते. प्रकृति-पुरुष ही अंतिम तत्त्वे मानली असल्यास, हे कर्मनाशक ज्ञान[16] त्यांच्याविषयी असू शकेल; तसेच गुण हेच कर्ते आहेत आणि आत्मा हा त्यांच्या[17] पलीकडे आहे, हे ज्ञान हवे. किंवा क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ[18] यामधील भेदाचे ज्ञान[19] हवे.

## हे ज्ञान कसे प्राप्त होते ?

हे ज्ञान कसे प्राप्त होते, याचा विचार आता करण्यास हरकत नाही. व्यावहारिक ज्ञानाच्या क्षेत्रातही विद्यार्थ्यांच्या पात्रतेनुसार विशिष्ट अभ्यासक्रमासाठी त्याची प्रवेश-योग्यता ठरविली जाते. उदा. विद्यार्थी पदवीधर असल्यावरच तो पदव्युत्तर अभ्यास-क्रमाला पात्र ठरतो. तीच तऱ्हा मोक्षोपयोगी ज्ञानाचे बाबतीत आहे. या ज्ञानप्राप्तीसाठी काही विशिष्ट गुण असणे– काही विशेष पात्रता अथवा अधिकार अंगी असणे– आवश्यक आहे. ज्ञानप्राप्तीला आवश्यक अशा गुणांची यादी भगवद्गीतेने १३-७-११ या श्लोकांत दिली आहे, ती जिज्ञासूंनी मुळांतूनच अवश्य पहावी. आणखी असेः– व्यवहारातही नुसती पात्रता असून चालत नाही; शिक्षकांचे साहाय्यही घ्यावे लागते. तद्वत्, उपर्युक्त गुण अंगी असूनही, मोक्षोपयोगी ज्ञान हे योग्य त्या गुरूच्या मुखातून प्राप्त करून घ्यावे लागते. हे ज्ञान तत्त्वदर्शी अथवा तत्त्वज्ञानी अशा अनुभवी तज्ज्ञांकडूनच प्राप्त करून घ्यायचे आहे. प्रणिपात, सेवा

---

१०. काम-क्रोध हे " ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेऊनी " ( ज्ञानेश्वरी ३.५३ ) हा भाग लक्षात घ्यावा.

११. ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः । ७.२. सातवा अध्याय, तसेच १४.२ पहा.

१२. ज्ञानं विज्ञानसहितं यद् ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् । ९.१. नववा अध्याय पहा.

१३. भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्व भूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ ५.२९.

१४. कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ ५.२६.

१५. ज्ञेयं यत् तत् प्रवक्ष्यामि यद् ज्ञात्वामृतमश्नुते । १३.१२.

१६. य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ १३.२३.

१७. नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १४.१९.

१८. येथे क्षेत्रज्ञ या शब्दाने ईश्वर अभिप्रेत आहे. पहा :–
क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत । १३.२

१९. क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ १३.३४













अनुक्रमणिका

आणि परिप्रश्न या साधनांनी हे मोक्षोपयोगी ज्ञान तज्ज्ञांकडून[२०] ग्रहण करावयाचे आहे. तसेच व्यावहारिक ज्ञान–प्राप्तीतही काही मर्यादेपर्यंत श्रद्धेची आवश्यकता असतेच. त्याचप्रमाणे मोक्षोपयोगी ज्ञान प्राप्त करून घेताना श्रद्धेची आवश्यकता आहे. यादृष्टीने छान्दोग्य उपनिषदात " श्रद्धत्स्व सोम्य, " असे जे गुरूने श्वेतकेतूला सांगितले आहे, त्याचा उलगडा होतो. भगवद्गीतेने तर ज्ञानप्राप्तीसाठी श्रद्धेची आवश्यकता अगदी स्पष्ट शब्दात सांगितली आहेच. इंद्रिय-संयमी, ज्ञानपर आणि श्रद्धायुक्त अशा जिज्ञासूलाच [२१] मोक्षोपयोगी ज्ञान मिळविता येते.

इतक्या सिद्धतेनिशी ज्ञानप्राप्तीचे साध्य प्राप्त झाल्यावर, त्या अंतिम तत्त्वाच्या ज्ञानाने सर्व कर्मांचा म्हणजे सर्व संचित आणि क्रियमाण कर्मांचा नाश होतो, ती सर्व कर्मे भस्मसात होतात. प्रारब्ध कर्मांचा नाश मात्र ज्ञानाने होत नाही; ते भोगूनच नष्ट होते.

२०. तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ४·३४

२१. श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः । ४·३९









डॉ. सौ. इंदुमती पारीख

# कुटुंबनियोजनाचे एक नवे साधन– ( लिपीज् लूप )

गर्भाशयात ठेवण्याचे कुटुंबनियोजन साधन एका अर्थाने फारसे नवे नाही. १९२८ च्या सुमारास डॉ. ग्रॅफिनबर्ग या जर्मन डॉक्टरने गर्भाशयाचे तोंडावर वसवता येणारी चांदीची ग्रॅफिनबर्ग रिंग तयार केली. थोडे दिवस ही रिंग बरीच लोकप्रिय होणार असे वाटू लागले. परंतु काही वर्षांच्या अवधीत या रिंगचे दुष्परिणाम लक्षात येऊ लागले. व तज्ञांनी ती वापरण्याचे सोडून दिले. भारतातही काही तुरळक डॉक्टर्स ही रिंग अगदी अलीकडे सुद्धा वापरताना दिसत होते. त्यानंतर संततिप्रतिबंधक रबरी साधनांचा प्रचार होऊन स्त्रियांनी वापरण्याचा रबरी डायफ्रॅम सर्वात सुरक्षित म्हणून मान्यता पावला. परंतु हा डायफ्रॅम वापरणे सर्वांनाच सोयीचे नव्हते. त्यासाठी झोपण्याची स्वतंत्र जागा पाहिजे; तो बसवण्याचे व काढण्याचे कसब स्त्रीने आत्मसात केले पाहिजे. या अडचणी अडाणी व दरिद्री लोकांना फारच मोठ्या प्रमाणात भासत असत. व म्हणून या साधनाचा उपयोग सामान्य जनतेपर्यंत पोचला नाही. त्यानंतर जनतेकरता तोंडाने घेता येण्यासारख्या कुटुंबनियोजन गोळ्यांचा शोध सुरू झाला. व अशा गोळ्या सापडल्याही. शास्त्रीयदृष्टया त्यात काही उणीवा असल्या तरी संततिप्रतिबंधक उपाय म्हणून त्या १०० टक्के यशस्वी ठरल्या. परंतु आपल्यासारख्या दरिद्री व अज्ञानी देशाला त्या वापरण्यात अनेक अडचणी आहेत. एक तर त्या दर महिन्यातून वीस दिवस न चुकता वर्षानुवर्षे घ्यावयास पाहिजेत म्हणजे कुटुंबाला त्याकरता कायम खर्च करावयास पाहिजे. त्या सध्यातरी फारच महाग (महिन्याचा कमीत कमी खर्च १० रुपये) आहेत. एखादवेळ गोळी घेण्यात चूक झाली. तर पाळी अनियमित होऊन गर्भधारणा होण्याचीही शक्यता आहे. या सर्व अडचणी दूर केल्यास गोळ्या यशस्वी होतील. पण सध्यातरी मोठ्या प्रमाणावर त्याचा वापर करणे आपल्याला अशक्य आहे. या गोळ्यांचे बरोबरच अमेरिका व जपानमध्ये गर्भाशयात ठेवता येणाऱ्या साधनांचे पुनरुज्जीवन झाले. व त्यावरील प्रयोग सुरू झाले.

**लिपीज् लूप :**

जगातील वाढत्या लोकसंख्येस आळा घालण्याकरता अनेक ठिकाणी अनेक शास्त्रज्ञांचे प्रयोग चालू आहेत. अशाच प्रयोगातून सध्याचा लिपीज् लूप तयार झाला. अमेरिकन डॉक्टर जॅक लिपीज यांनी हा बनवला म्हणून त्याला लिपीज लूप असे नांव पडले. गेल्या महायुद्धात जखमी झालेल्या सैनिकावर शस्त्रक्रिया करीत असताना पॉलिथीन हा पदार्थ निर्वेधपणे शरीरात राहू शकतो; त्यामुळे किंवा त्यावर काहीही प्रक्रिया होत नाही असे सिद्ध झाले. या गोष्टीचा उपयोग करुन अनेक लोकांनी पॉलिथीनच्या व नायलॉनच्या धाग्याची गर्भाशयात ठेवता येणारी संतती प्रतिबंधक साधने तयार करण्यास सुरवात केली. यातूनच जपानी रोटा रिंग, व अमेरिकन लिपीज् लूप व मार्ग्युलिज स्पायरल ही साधने उत्क्रांत झाली. या सर्व साधनात भारतामध्ये लिपीज् लूप, तज्ञांच्या मर्जीस उतरला असून सेंट्रल मेडिकल रिसर्च कौंसिल दिल्ली, या सर्वोच्च मेडिकल संस्थेने त्याला मान्यता दिली आहे. आपलेकडे या साधनाबद्दल गेली दीड दोन वर्षे प्रयोग चालू आहेत.

लिपीज् लूप हा एक पॉलिथीनच्या तारेचा नागमोडी तुकडा असून त्याचा आकार एकाखाली एक जोडलेल्या इंग्रजी एस् (S) च्या आकारासारखा आहे. तो निरनिराळ्या मापांचा केलेला असतो. निरनिराळ्या मापाच्या गर्भाशयात ठेवण्यास लहानापासून मोठा लूप वापरता येतो.

लूप गर्भाशयात ठेवणे फारसे कठीण नसते. तो ठेवण्यासाठी गर्भाशयाचे तोंड ताणावे लागत नाही. किंवा स्त्रीला "भूल" द्यावी लागत नाही. कारण त्यात कोठल्याही प्रकारची शस्त्रक्रिया किंवा दुखापत








होत नाही. हा लूप गर्भाशयात ठेवण्याकरता, गर्भाशयात चटकन घालता येईल असे नळीसारखे साधन ( Inserter ) असून त्यामध्ये हा लूप ओवावा लागतो. नळीत असता तो सरळ होतो. परंतु पॉलीथीनच्याच सळईने तो गर्भाशयात लोटला म्हणजे त्याचा आकार पूर्ववत् होतो. पॉलिथीनचा सर्वच्या सर्व भाग गर्भाशयात रहातो. हा लूप गर्भाशयात आहे की नाही हे पहाण्याकरता व वेळ प्रसंगी लूप काढण्याकरता या लूपच्या खालच्या टोकास तीन सेंटीमीटर लांबीचा नायलॉनचा धागा घट्ट बांधलेला असतो. हा धागा गर्भाशयाच्या बाहेर योनीच्या वाटेत लोंबता रहातो. तेथील उष्णतेने तो इतका मऊ होतो की शरीरास तो टोचत नाही. परतु स्त्री आपण स्वतः लूप ठिकाणावर आहे की नाही ते पाहू शकते. त्याचप्रमाणे लूप काढून घ्यावयाचा असल्यास हा धागा पकडून त्याला शांतपणे सारख्या जोराने (५० ते ६० ग्रॅम वजनाचा जोर पुरेसा असतो.) ओढत गेले म्हणजे हळू हळू लूप सरळ होतो व कोठल्याही शस्त्रक्रियेखेरीज काढता येतो. स्त्रीने स्वतः लूप काढण्याची कोशीस न करणे बरे, कारण जोर सारखा व एकाच दिशेने लागणे आवश्यक असते.

## सोयीचे साधन

लूप गर्भाशयात ठेवल्यावरोबर किंवा नंतरच्या २-४ दिवसात काही स्त्रियांच्या पोटात दुखते. परंतु हे दुखणे बहुसंख्य वेळा मामुली असते. ॲस्पिरिनसारख्या साध्या औषधांनी ते थांबते. काही स्त्रियांना थोडासा रक्तस्रावही होतो. काही वेळा थोडे थोडे डाग लागणे ८-१५ दिवस चालू रहाते. त्यावर पण कॅलशियम किंवा अरबोलीनसारख्या मामुली गोळ्यांनी उपाय करता येतो. लूप बसविल्यानंतर पहिली मासिक पाळी कदाचित् जास्त प्रमाणात येण्याची शक्यता आहे. काहींना बराच रक्तस्राव होतो तर काहींना तो जास्त दिवस होतो. परंतु या रक्तस्रावावरही वरील गोळ्या चालतात. फारच रक्तस्राव झाला तर डॉक्टरकडे जाऊन एखाददुसरे इंजेक्शन घेतले की काम होते. ही सर्व दुखणी अल्पकाळची आहेत. एकदा सर्व स्थिरस्थावर झाले म्हणजे स्त्रीला कोठलाही त्रास होत नाही. साधन बाहेर काढून साफ करावे लागत नाही की, ते पुन्हा पुन्हा घालावेही लागत नाही. पाहिजे तितकी वर्षे हे साधन गर्भाशयात राहू शकते. सुरवातीस तीन तीन महिन्यांनी व नंतर वर्षावर्षाने डॉक्टरकडून तपासणी करून घेतली तर जास्त बरे असते. ही तपासणी शिकलेल्या नर्सेस किंवा मिडवाइव्ज पण करू शकतात. त्यामुळे ग्रामीण भागातसुद्धा याचा वापर करणे सोईचे आहे.

लूप वापरण्याचा महत्वाचा फायदा म्हणजे तो संतति कायम बंद करण्याकरता जसा वापरात येतो तसाच दोन मुलांचे मध्ये पाहिजे तेवढे अंतर ठेवण्याकरता पण वापरता येतो. गर्भाशयावर या लूपचे काहीही परिणाम होत नाहीत व त्यामुळे लूप काढून घेतला की पुन्हा मूल होणे शक्य होते. यामुळे हा लूप कोणच्याही वयाची स्त्री बीनधोक वापरू शकते. लग्न झाल्याबरोबर काही कारणाकरता लवकर मूल नको असेल तर युरोप, अमेरिकेत त्या वेळीही हा लूप ठेवून घेणाऱ्या अनेक स्त्रिया सापडतात. आपल्याकडे सुद्धा मुलींची लग्ने खूप लवकर होतात व त्यामुळे त्यांना मुलेही लवकर होतात. पंधरा सोळा वर्षांच्या अनेक माता विशेषतः मागासलेल्या जमातीत सापडतात. अशा मातांनी हा लूप वापरल्यास संततिनियमन तर होईलच परंतु लहान वयात अशक्तपणा येऊन त्यांच्या शरीराची होणारी धूळधाणही थांबवता येईल. लूप काढला म्हणजे मूल होऊ शकते. हे नक्की असल्यावर लूप वापरण्याविरुद्ध फारशी अढी निर्माण होणार नाही. अर्थात यासाठी अत्यंत सोप्या भाषेत लूपची माहिती सर्वत्र पसरविणे अत्यंत जरूर आहे. ग्रामीण व मागासलेल्या जमातींना ते पटवून देणे सोपे नसले तरी अगदी अशक्यही नाही. दोन मुलांचे मध्ये व्यवस्थित अंतर ठेवल्यास सर्वांचा कसा फायदा होतो हे त्यांना दाखवून दिले पाहिजे. कदाचित् एक मूल होण्यापूर्वी लूप वापरण्यास स्त्रिया तयार होणार नाहीत. परंतु त्यानंतर जरी त्या तयार झाल्या तरी पुष्कळ कार्यभाग साधेल. व लोकसंख्या वाढीस पण बराच आळा घालता येईल. ठराविक वर्षांच्या अंतराने दोन किंवा तीन मुले झाल्यास मुलांची व बाईची प्रकृति निकोप राहील- तिला आपल्या संसाराकडे लक्ष देण्यास भरपूर वाव मिळेल. हे फायदे उदाहरणाने दाखवावे लागतील. त्याकरता मागसवर्गातील काही म्होरके पकडून त्यांना हे सर्व








पटवून द्यावे लागेल व मगच त्याचा प्रचार होईल. काम सोपे नाही पण अत्यावश्यक मात्र आहे. त्यासाठी सर्व प्रयत्न व्हावयास पाहिजेत.

## सुरक्षित साधन

लूप गर्भाशयात ठेवल्यानंतर तो तावडतोब परिणामकारक ठरतो. काही स्त्रियांना होणारा त्रास लक्षात घेऊन ३-४ दिवसांचा संयम राखण्यास सांगितले तर जास्त बरे असे मला वाटते. परंतु एकदा लूप व्यवस्थित आत बसविलेला असला म्हणजे दुसरे कोणतेही साधन वापरण्याची जरूरी नाही. परंतु शंभरातील पाच ते सात स्त्रियांच्या गर्भाशयाला हा लूप सहन होत नाही. व थोड्याच दिवसात तो बाहेर फेकला जातो. त्यातील काही स्त्रियांना तोच किंवा त्यापेक्षा लहान लूप पुन्हा बसवल्यास त्रास होत नाही. व तो व्यवस्थित बसतो. काही स्त्रियांना मात्र कोठलाच लूप सहन होत नाही. काही वेळा रक्तस्राव फार झाल्यास बाईची प्रकृति त्यामुळे बिघडू नये म्हणून लूप काढावा लागतो. अशा स्त्रियांची संख्या फारच कमी म्हणजे शंभरात दोन किंवा तीन असते. काहींच्या पोटात भयंकर दुखते, पोटात गोळे येतात व त्यामुळेही काही वेळा लूप काढावा लागतो. हे सर्व अपवाद लक्षात घेऊनही हा लूप ८५ टक्के सुरक्षित आहे अशी सर्व शास्त्रज्ञांची खात्री झालेली आहे. आतापर्यंत अस्तित्वात असलेले कोणतेही संतति प्रतिबंधक साधन शंभर टक्के सुरक्षित नाही. कारण माणूस प्रमादशील आहे. त्याच्या हातून चुकाही होतात. या लूपमुळे बरेचसे धोके टाळले जातात. तो सतत गर्भाशयात राहतो. त्यासाठी खाजगी झोपण्याची खोली असण्याची गरज नाही. मोठी माणसे किंवा लहान मुले यांना त्याबद्दल काहीही समजण्याची शक्यता नाही. व त्यामुळे एकदा डॉक्टरकडे जाऊन आले की काम होते.

लूप गर्भाशयात बसविल्यानंतर जड-भारी काम करण्यास काहीही हरकत नाही. तशी हरकत ज्या साधनाबद्दल निर्माण होईल ते साधन साधारणपणे कोणतीही स्त्री वापरू शकणार नाही. अजिबात काम न करावे लागणारी स्त्री विरळाच. या लूपमुळे आपल्या दैनंदिन जीवनात कसलाही बदल करण्याची जरूरी नाही. भांडी घासणे, कपडे धुणे, जिन्यावरून सामान वर नेणे, फार काय कुंभाराची माती मळणे यासारखी अवजड कामे करताना लूप बसवलेल्या स्त्रियांना मी पाहिले आहे. त्यांना त्रास होतो का विचारले आहे. ग्रामीण भागात हा लूप लोकप्रिय होण्यास हेही एक महत्त्वाचे कारण ठरणार आहे. पाहिजे ते काम करा; लूपला धक्का लागणार नाही. कारण गर्भाशयाची रचनाच अशी आहे की त्याचे आत असलेली वस्तू सहजासहजी बाहेर निघूच शकत नाही. त्यामुळे जड कामाचा त्याचेवर परिणाम होत नाही व कामात अडथळा येत नाही.

## कॅन्सरचे वा अन्य भय नाही

लूप वर्षानुवर्षे गर्भाशयात राहिल्यास कॅन्सर सारखा रोग होण्याची शक्यता आहे की काय असा प्रश्न साहाजिकच निर्माण होतो. परंतु गेल्या ७-८ वर्षात विशेषतः अमेरिकेत यावर जे संशोधन चालू आहे त्यावरून अजून एकही कॅन्सरची केस लूपमुळे आली असे निदर्शनास आलेले नाही. अमेरिकेत हजारो स्त्रियांनी हे लूप्स बसवून घेतले आहेत. यापैकी प्रत्येक स्त्रीची वेळोवेळी कॅन्सरसाठी तपासणी करण्याचा तेथील कुटुंब नियोजन केन्द्राचा पायंडा आहे. त्यामुळे अशा तऱ्हेची एखादी केस झाली असती तर त्याचा गवगवा झाला असता. आपल्याकडे सुद्धा इंडियन कॅन्सर रिसर्च सेंटर मुंबई, या संस्थेच्या वतीने चालू असलेल्या कुटुंब नियोजन केंद्रात या लूप बसवणाऱ्या प्रत्येक स्त्रीची वेळोवेळी कॅन्सरसाठी तपासणी करण्यात येते. गेल्या सबंध वर्षात तरी अशी केस आढळली नाही. आपल्याकडे लूप वापरणाऱ्यांची संख्या व वर्षे फारच थोडी आहेत. परंतु अमेरिकेत सर्व जगातून केस रिपोर्टस मागवले जातात. त्यामध्येही कॅन्सर झाल्याचे उदाहरण नाही हे विशेष होय.

लूप गर्भाशयात रहातो व नायलॉनचा धागा योनीच्या वाटेत लोंबतो त्यामुळे रोगजंतू त्या धाग्या-वरून गर्भाशयात पोचणार नाहीत का? असाही प्रश्न विशेषतः डॉक्टरमंडळींच्या डोक्यात येण्याची शक्यता आहे. परंतु निसर्गाने गर्भाशयाला वाटते त्यापेक्षा जास्त कणखर बनवले आहे. आतापर्यंतच्या अनुभवावरून असे म्हणता येते की गर्भाशयात गर्भ किंवा त्याचे अर्धवट भाग शिल्लक नसतील तर त्यास



अनुक्रमणिका






कोणतेही रोगजंतू सतावू शतक नाहीत. गर्भाशयाचे आतले आवरण पुन्हापुन्हा तयार होते व ते दर महिन्यास बाहेर फेकले जाते. यामुळेही कदाचित रोगजंतूंना घर करण्यास वाव मिळत नसेल. एवढे मात्र खरे की, गर्भ नसलेले गर्भाशय सदैव रोगमुक्त असते. ( It is practically impossible to infect a non preguant uterus) व त्यामुळे या लूपच्या बाबतीत ही भीती रहात नाही. स्त्रियांचे रोग हे बहुतेक सर्व योनिभागातील किंवा गर्भाशयाच्या बाहेरील भागावरचे असतात. व गर्भाशयाला सूज येणे वगैरे प्रकार गर्भपातानंतर किंवा प्रसूतिनंतरच होतात.

लूप गर्भाशयात असल्याने गर्भ का रहात नाही हाही महत्त्वाचा प्रश्न आहे व त्यावर अनेक ठिकाणी संशोधन चालू आहे. याचे नक्की उत्तर लवकरच मिळेल असे वाटते. परंतु लूप गर्भाशयात एक बाह्य वस्तू म्हणून रहातो. व त्यामुळे गर्भाशयातील वातावरण अशा प्रकारचे रहाते की पक्क होऊन, बीज-नलिकेच्या द्वारे गर्भाशयात येणारे स्त्री बीज त्यातून चटकन बाहेर फेकले जाते. काही वेळा पूं बीज त्यापर्यंत पोचतही असेल असे नाही. त्यांचे मीलन होण्याची शक्यता पण आहे. परंतु हे मीलन झाल्यानंतर ही फलित बीजे गर्भाशयात रुतावी ( nedation ) लागतात. तरच गर्भ वाढू शकतो. मूल तयार होऊ शकते. या लूपमुळे ही रुतण्याची क्रिया होतच नाही व त्यामुळे हे बीज ताबडतोब बाहेर पडते. व गर्भ रहात नाही. त्यामुळे या लूपने गर्भपात होतो असे म्हणणे बरोबर नाही. तसे पाहिल्यास स्त्रीची मासिक पाळी ही सुद्धा अफलित बीजाचा पातच असते. त्यातलाच हा प्रकार. क्वचित प्रसंगी फलित बीजाचा पात होतो की काय यावर सध्या संशोधन चालू आहे. याचा लवकरच उलगडा होईल असे वाटते.

लूप गर्भाशयात असता मासिक पाळीत काहीही अडचण येत नाही. कारण या लूपचा अंतस्रावग्रंथीवर काहीही परिणाम होत नाही. त्याचे काम व्यवस्थित चालते. व त्यामुळे शरीरावर दुसरा कसलाही परिणाम होण्याची शक्यता नाही. म्हणूनही हा लूप बिनधोक-पणे मुलगी वयात आल्यापासून स्त्रीची मासिक पाळी बंद होईपर्यंत केव्हाही गर्भाशयात ठेवता येतो. त्याला वयाची मर्यादा नाही. गर्भाशयात गर्भ नसणे येवढीच अट आहे. त्यासाठी बसवणाराने योग्य काळजी घेणे जरूर आहे. या दृष्टीने लूप बसविण्यास सर्वात सोयीची वेळ म्हणजे मासिक पाळी संपल्यावरोबर. कारण त्यावेळी गर्भधारणा नक्कीच झालेली नसते. इतर वेळी सुद्धा गर्भधारणा झालेली नाही अशी डॉक्टरची खात्री असल्यास लूप बसविण्यास हरकत नाही. कारण कोणीही डॉक्टर हे काम व्यवस्थित तपासणी करूनच करील हे निश्चित. बाळंतपणानंतर १।। ते २ महिन्याच्या काळात गर्भाशय पूर्व स्थितीला येतो. व त्यामुळे या कालानंतर ताबडतोब लूप बसवणे जरूर असते. पुष्कळ वेळा मासिक पाळीस सुरवात होण्याच्या आतही गर्भधारणा होते. आपल्याकडे असा समज आहे की मासिक पाळीस सुरवात झाली नाही किंवा मूल अंगावर दूध पीत असले म्हणजे गर्भ रहात नाही. हा समज सपशेल चुकीचा आहे. या काळात अनेक स्त्रियांना गर्भधारणा होते व त्या पस्तावतात. म्हणून बाळंतपणानंतर डॉक्टरी तपासणी करून संततिप्रतिबंधक साधन वापरण्यास सुरवात करूनच नवरावायकोने एकत्र येणे जरूर असते. गर्भपातानंतर तर पुन्हा गर्भधारणा होण्याची शक्यता फारच वाढलेली असते. त्या वेळी पण सावधगिरी राखणे जरूर असते. व्यवस्थित गर्भप.त झाला असल्यास त्यानंतर येणाऱ्या पहिल्या पाळीनंतर साधन बसविता येते. क्वचित प्रसंगी तपासणी करून गर्भाशय पूर्ववत् झालेले असले तर गर्भपातानंतर १५-२० दिवसांनी पण लूप बसविता येतो.

या सर्व विवेचनावरून लूप हा आपल्या देशाच्या परिस्थितीत वापरण्यास योग्य साधन आहे. असे माझ्याप्रमाणेच अनेकांना वाटेल असे वाटते. परंतु या साधनाला दुसरी बाजूच नाही असे माझे मत नाही. त्यात दोष आहेत. त्यामुळे त्रास होतो. क्वचित प्रसंगी पुष्कळ त्रास होण्याची पण शक्यता आहे. लूप म्हणजे संततिप्रतिबंधक साधनातील 'शेवटचा शब्द' ( Last word ) नव्हे. संशोधन चालूच राहील. यापेक्षाही परिणामकारक, सुरक्षित सोईची साधने उपलब्ध पण होतील. माणसाच्या प्रगतीवर








माझा विश्वास आहे. परंतु त्यातील सर्व दोष लक्षात घेऊनही सध्या उपलब्ध असलेल्या साधनात आपल्या परिस्थितीत वापरता येणारे, आपल्याला परवडणारे व फार मोठ्या प्रमाणात स्वीकार्य असे हे साधन आहे असे म्हणावे लागते.

## लोकसंख्येचा प्रश्न

भारताची लोकसंख्या दरसाल २-४ टक्क्यांनी वाढत आहे. पुढील काही वर्षात आपण काहीही केले नाही तर ही संख्या १९८६ सालपर्यंत ७७ ते ७८ कोटींच्या घरात जाईल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. कदाचित् सुधारलेल्या राहणीमानामुळे लोकसंख्या वाढीचा वेग आणखीही वाढण्याची शक्यता आहे. या सर्व गोष्टी लक्षात घेता दुसरी सर्व कामे बाजूस सारूनसुद्धा कुटुंबनियोजनाचे कार्य करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. कारण आपली लोकसंख्याच आपल्या प्रगतीच्या मार्गातील धोंड होत आहे. कोटलीही गोष्ट एवढ्या मोठ्या लोकसंख्येकरता करणे किती अशक्य आहे याचा अनुभव पावलोपावली येत आहे. लोकसंख्या स्थिर करणे, तिचा कल कमी कडे झुकविणे हे आज सर्वात महत्त्वाचे कार्य आहे. स्वातंत्र्याच्या चळवळीने स्वतःचे भवितव्य ठरवण्याचे स्वातंत्र्य दिले. परंतु गेल्या १७ वर्षातील. अनुभव असा आहे की स्वातंत्र्य मिळाले पण स्थैर्य मिळाले नाही. कुटुंबनियोजनाच्या चळवळीत राष्ट्राला हे स्थैर्य मिळवून देण्याचे सामर्थ्य आहे. परंतु ही चळवळ योग्य दिशेने व योग्य अशा वैचारिक पातळीवरून चालवली पाहिजे. यांत्रिक दृष्टीकोनातून चालवलेली चळवळ यशस्वी होणार नाही व कार्यभागही साधणार नाही.

## स्त्रियांचे दास्यविमोचन

कुटंबनियोजनाची चळवळ रानडे, गोखले, फुले, आगरकर, कर्वे यांनी सुरू केलेल्या स्त्रीविमोचन चळवळीचा भाग आहे. या चळवळीची दिशा उलटी फिरविण्याचे सामर्थ्य कोणात आहे असे मला वाटत नाही. कारण पुरुषांनी सुरू केलेली ही चळवळ स्त्रीपर्यंत पोचली आहे. मिळालेले स्वातंत्र्य उपभोगण्याकरता व ते विस्तृत करण्याकरता झगडण्यास ती समर्थ झाली आहे. समर्थ व सुसंस्कृत स्त्री हीच कुटुंबाचा आधार होऊ शकते. आपले भवितव्य आपल्या हातात आहे याची जाणीव कुटुंबनियोजन स्त्रीस करून देते. तिचा आत्मविश्वास वाढतो व त्यातूनच कुटुंबाची व पर्यायाने राष्ट्राची प्रगति होणार आहे. एक सुसंस्कृत स्त्री सर्वच्या सर्व कुटुंबाचे भवितव्य उज्ज्वल करून टाकते. अशा सुसंस्कृत स्त्रिया हेच राष्ट्राचे वैभव ठरणार आहे.

## प्राथमिक गरजा व प्रगती

सध्या राष्ट्राची जवळजवळ सर्वच्या सर्व शक्ती व संपत्ती राष्ट्रातील जनतेच्या अन्न, वस्त्र व निवारा या प्राथमिक गरजा पुऱ्या करण्यात खर्च होत आहे. इतर गोष्टींकडे लक्ष देणे जवळ जवळ अशक्य झाले आहे. जे राष्ट्र आपल्या सर्व शक्तींचा उपयोग निव्वळ प्राथमिक गरजा भागवण्यातच करीत राहील ते राष्ट्र प्रगतीच्या मार्गावर आहे असे म्हणणे धाडसाचे ठरेल. आणि आज आपण हेच करीत आहोत. वाढत्या तोंडात अन्न घालणे व त्यांना कसेतरी सांभाळणे आज शक्य आहे. माणूस म्हणून जगण्याची आपली पात्रता नाही असे काही वेळा वाटू लागते. कारण माणसाचे अन्न वस्त्र व निवारा या गोष्टींनी समाधान होत नाही. त्याला इतर अनेक गोष्टी पाहिजे असतात. पण ज्यावेळी तो प्राथमिक गरजा भागवण्यातच मग्न असतो तेव्हा त्याचे इतर उच्च उदात्त गोष्टीकडे लक्ष जाणे शक्य नाही. वाढती लोकसंख्या राष्ट्राची हानी करीत आहे, प्रगतिपथावरून राष्ट्राला खाली ओढीत आहे. त्यासाठी तावडतोब काहीतरी करण्याची गरज आहे. याबद्दल दुमत नाही.

पुरुषांचेवरील शस्त्रक्रिया हा सर्वात निर्णायक स्वरूपाचा उपाय आज शक्य तितका लोकप्रिय करण्याचा प्रयत्न होत आहे. अनेक वेळा ३ किंवा ४ मुलानंतर बाई पण शस्त्रक्रिया करून घेण्यास तयार होते. परंतु हा अंतिम उपाय आहे. तो पुन्हा सहजासहजी फिरवता येत नाही म्हणून त्याला चटकन लोक तयार होत नाहीत. म्हणूनच लहान वयात तो सहसा उपयोगात आणला जात नाही. आपलेकडे लग्नाची वये लहान असल्यामुळे संततीचे उत्पादनही लवकर सुरू होते. म्हणून








लवकरात लवकर उपयोगात आणता येईल अशाच उपायाची गरज आहे. तो कोणासही कोठेही उपलब्ध पाहिजे. या सर्व दृष्टीने विचार करता कमी खर्चाचा, थोड्याशा त्रासाचा परंतु बहुसंख्य स्त्रियांच्या अत्यंत सोयीचा हा लूप लोकप्रिय करणे जरूर आहे.

## सामाजिक आंदोलनाची गरज

नुसत्या सरकारी प्रयत्नांनी हे काम होणार नाही. ही सामाजिक गरज आहे; ती सामाजिक चळवळीनेच भागली पाहिजे. सामाजिक जागृति हेच ही चळवळ यशस्वी करण्याचे मुख्य साधन आहे. ही चळवळ एकदा करून संपणार नाही. ती सतत पिढयान् पिढया चालू राहिली पाहिजे, तिचे महत्त्व समाजातील प्रत्येक स्त्री-पुरुषास पटले पाहिजे. ती एका प्रान्तापुरती मर्यादित रहाता कामा नये. शहरातून खेड्यातून राष्ट्राच्या कोना कोपऱ्यातून, स्वस्त, साधे व पटकन वापरता येणारे साधन उपलब्ध करून देणे हे सरकारप्रमाणेच अनेक सामाजिक संस्थांचे कार्य आहे. अनेक लहानमोठ्या गावी स्त्रियांच्या निरनिराळ्या संस्था अस्तित्वात आहेत. आपआपल्या परीने त्या सामाजिक चळवळीत भाग घेत आहेत. त्या सर्वांनी ही चळवळ आपली म्हणून चालवावी. त्यात पुढाकार घ्यावा व आपल्या अज्ञानी व दरिद्री राष्ट्राची सेवा करण्याची संधी वाया घालवू नये. पुरुषवर्गाने पण या चळवळीत मोठा वाटा उचलण्याची गरज आहे. बहुसंख्य स्त्रिया या बाबतीत पुढाकार घेण्यास अजून तरी तयार नाहीत. वेळी अवेळी होणाऱ्या बाळंतपणाने व पोरांच्या लेंढाराने कंटाळलेली स्त्री साधन वापरण्यास पटकन तयार होईल. परंतु अजूनही घरातील पुरुषांचा व वडीलधाऱ्या माणसांचाच तिच्या आयुष्यावर ताबा असतो. हा ताबा सैल करून वेळ प्रसंगी साधन वापरण्यास प्रोत्साहन देऊन पुरुषांनी या चळवळीस हातभार लावला तर त्यांचे जीवन सुखाचे व समाधानाचे होईल. आटोक्यात आलेली, स्थिर झालेली लोकसंख्या आपले अनेक प्रश्न सोडवण्यास मदत करील. लोकसंख्या आटोक्यात आणण्याचे सामर्थ्य या लहानशा पॉलिथीनच्या तुकड्यात आहे असे माझे मत आहे. हजारोंनी लाखांनी नव्हे कोटींनी तो वापरावा त्यातील उणीवा दूर कराव्या व फार मोठ्या राष्ट्रीय चळवळीस हातभार लावावा.

---

## नवभारतच्या लेखकास संपादकीय सूचना

‘ नवभारत ’ मासिकामध्ये प्रसिद्ध करण्याकरिता लेखक लेख पाठवीत असतात. हे लेख पाठविल्यावर त्वरित प्रसिद्ध व्हावा अशी निकड लावतात. लेख प्रसिद्ध करण्याच्या अगोदर तपासून घ्यावा लागतो. तपासल्यानंतर त्यास काही काळ जातो. नवभारतातील लेखांचे वैचित्र्य राखण्याकरिता लेखांची प्रत्येक अंकाला जुळणी करावी लागते. या जुळणीत क्रम लावावा लागतो. म्हणून आलेले लेख त्वरित एक दोन महिन्यात प्रसिद्ध व्हावा अशी निकड लेखकवर्गाने लावू नये अशी त्यास नम्र विनंती आहे. **आलेले लेख पसंत पडल्यावर आमच्या सोयीनेच आम्ही प्रसिद्ध करू.**



अनुक्रमणिका






## पुस्तक परिचय –

पुस्तकाचे नांवः– **श्री. ग. आ. गवई– व्यक्ती आणि कार्य.**

लेखक–श्री. ना. रा. शेंडे.

प्रकाशक–प्रभाकर पांडुरंग भटकर, अमरावती.

मूल्य– रुपये सहा.

श्री. ग. आ. ऊर्फ नानासाहेब गवई यांच्या चरित्रातील महत्त्वाच्या घटनांच्या अनुषंगाने विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास या चरित्रग्रंथात श्री. ना. रा. शेंडे यांनी सांगितलेला आहे. प्रारंभीच्या निवेदनात श्री. शेंडे लिहितात : "सामान्यतः गेल्या एका शतकाच्या दीर्घ कालखंडात अनेक दलित पुढारी होऊन गेले. आणि त्यांनी त्या त्या काळाच्यामानाने आपापल्या क्षेत्रात दलितोद्धाराचे शक्य ते कार्य केले परंतु त्यांचा व त्यांच्या कामगिरीचा कुठेच उल्लेख नाही असे आढळून येते. त्यामुळे त्यांचे अस्तित्व, कर्तृत्व, महत्त्व व प्रभुत्व यांचे ऐतिहासिक दृष्टचा मूल्यमापन करणे दुष्कर झाले आहे." अशा सामाजिक व ऐतिहासिक जाणिवेतून श्री. गवई यांचे जीवन अवलोकन करताना, 'भारतभर दलितोद्धाराची नांदी दुमदुमविणाऱ्या, सामाजिक क्षेत्रात स्पृहणीय कार्य करणाऱ्या, सत्कृत्यांचा डोंगर निर्माण करणाऱ्या, शैक्षणिक क्षेत्रांत कर्तृत्वाचा ध्वज फडकविणाऱ्या, व्यासंगी, तत्त्ववेत्त्या, पत्रकार, लेखक व कवी असलेल्या थोर व्यक्तिमत्त्वाच्या–नानासाहेबांच्या विषयी–कृतज्ञतेची भावना उचंबळून येऊन श्री. शेंडे यानी चरित्र लिहिले आहे. त्याचप्रमाणे आपल्या या ग्रंथामुळे संपूर्ण मराठी मुलुखातील दलितांच्या जातीपोटजातींचा, त्यांच्या धंदा-व्यवहार-संस्कृतीचा इतिहास लिहिण्यास कोणास प्रेरणा व्हावी अशीही लेखकाची इच्छा आहे.

हे चरित्रलेखन करीत असताना माहिती गोळा करण्याच्या बाबतीत श्री. शेंडे यांनी बरीच मेहनत घेतलेली स्पष्ट दिसत आहे. परंतु या सर्व माहितीतून त्या काळाचे किंवा त्या प्रसंगाचे वातावरण निर्माण करण्याकडे त्यांनी लक्ष दिलेले नाही. तसेच अनेक घटनांमध्ये दिसणारे गवईंचे व्यक्तिमत्त्वही वाचकालाच प्रतीत व्हावे अशा पद्धतीने त्याची मांडणी केलेली नाही. त्यामुळे स्थूलपणे चरित्राचे कथन केलेले आहे. आणि अत्यंत श्रद्धेने, कळकळीने त्यावर त्या त्या क्षणी मनात आलेल्या भावनेला वाट दिलेली आहे. ह्याच पद्धतीने गवईंच्या चरित्राचा एकत्रित विचारही लेखकाने केलेला नाही. त्यामुळे स्वतः लेखकच म्हणतात त्याप्रमाणे हे चरित्र चांगल्या चरित्रग्रंथाच्या साधनांच्या स्वरूपाचे झाले आहे. इथे श्री. गवई यांची ओळख होते पण त्यांच्या कार्याचे मूल्यमापन ज्या वस्तुनिष्ठपणाने, दलितोद्धाराचे सर्व प्रयत्न डोळचापुढे ठेवून व त्याचा सामाजिक व राजकीय जीवनावर झालेल्या परिणामांच्या संदर्भात करावयास हवे ते मात्र फारसे होत नाही. डॉ. आंबेडकर व श्री. गवई यांच्यातील मतभेद आणि दलितांच्या हिताशी त्याचा असलेला संबंध यासंबंधी केलेले विवेचन मूल्यमापनाच्या दृष्टीने उल्लेखनीय असून चरित्रातील ते एक महत्त्वाचे व अत्यंत वाचनीय असे प्रकरण आहे.

श्री. गवई यांच्या आयुष्यात कसोटीचे, अटीतटीचे प्रसंग पुष्कळ आहेत. बिकट परिस्थितीतून मार्ग काढताना वैयक्तिक प्रतिष्ठेपेक्षा दलितांच्या सुखदुःखाचा, विकासाचा विचार प्रामुख्याने त्यानी केलेला दिसतो. इतकेच नव्हे तर स्पृश्य हिंदूंच्या अन्यायकारक व अपमानास्पद आचरणासंबंधी चीड असूनही अन्यायाचा प्रतिकार करतानाही सर्व हिंदु समाजाच्या हिताहिताचा विचार नजरेआड होऊ दिला नाही हे विशेष आहे. त्यामुळेच श्री. गवईंच्या व्यक्तिमत्त्वाचा मोठेपणा, अनेक समकालीनांपेक्षा वेगळचा व दूरदृष्टीने विचार करण्याऱ्या त्याच्या या विशेषांतून मनावर ठसतो. चरित्राच्या शेवटी श्री. गवईंना आलेली व त्यांनी लिहिलेली काही पत्रे छापली आहेत. त्यापैकी कोल्हापूरच्या शाहूमहाराजांचे पत्र, मराठा दलित समाजाच्या उद्धाराबाबत शाहूमहाराजांची नेमकी कोणती दृष्टी होती, त्याची कल्पना देणारे आहे. श्री. गवईंची पत्रे त्यांच्या पुरोगामी व निर्मळ विचारसरणीची कल्पना देतात.

सामाजिक चळवळींचा इतिहास सांगणाऱ्या मराठी ग्रंथामध्ये श्री. शेंडे यांनी लिहिलेल्या या चरित्राने मोलाची भर घातलेली आहे हे निःसंशय.

**– सरोजिनी वैद्य**





अनुक्रमणिका

# सार-संकलन

## पाकिस्तान

पाकिस्तानचे अध्यक्ष आयूबखान अग्नीशी खेळू लागले म्हणजे त्याच्या धुराने भारताला गुदमरून टाकण्याचा त्यांचा उद्देश असतो. नव्यानेच मिळालेल्या आपल्या लाल चिनी दोस्ताचा पाहुणचार घेत असता पेकिंगहून बराचसा धूर त्यांनी भारताच्या दिशेने सोडला. आयूबखानच्या स्वागतार्थ उडालेल्या तोफांतून व 'स्वर्गीय शांततेच्या दरवाज्यावर' उभारलेल्या भव्य कमानींना लटकावलेल्या केशरी रंगाच्या आठ रेशमी दिव्याच्या प्रकाशातूनही हे धुराचे लोट निघाले असण्याची शक्यता आहे. लाल चिनी नागरिकांनी घंटा व ताशे बडवून पेकिंगमध्ये आयूबखानचे अभूतपूर्व स्वागत केले. सिआटो ( SEATO ) व सेंटो ( CENTO ) करारातील सहकाऱ्यांनी पेकिंगमध्ये झालेल्या बोलण्याचे वृत्त वाचल्यानंतर त्यांच्या सदऱ्याच्या कॉलर्सखालूनही धुराचे लहानलहान लोट बाहेर पडले असतील.

लाल चीनचे अध्यक्ष, ल्यु-शाव-ची यांनी दिलेल्या मेजवानीचे वेळी आपण वाशिंग्टन व पेकिंग त्यांचेत व्हिएटनाम प्रश्नावर समझोता घडवून आणण्याकरता सचोटीचे प्रयत्न करणार आहोत असे आयूबखानने जाहीर केले. चीन व अमेरिका या दोन्ही राष्ट्रांनी याबद्दल आस्था दाखवलेली नाही. चाउ-एन-लाय यांचेशी केलेल्या खाजगी चर्चेत मात्र गतवर्षी चीनने पाकिस्तानला देऊ केलेल्या ६ कोट डॉलर्सच्या बिन-व्याजी कर्जाबद्दल बोलणी झाली असे समजते. या पैशातून पाकिस्तान चीनकडून सिमेंट, कापड, व मशिनरी विकत घेणार होते.

## दोघांचा एक शत्रू

१९६२ साली चीनने भारताची सीमा कुरतडण्यास सुरवात केली व त्यांचेशी आयूबची मैत्री जमू लागली. त्यावेळी, ब्रिटन, अमेरिका, फार काय रशियानेसुद्धा भारताला तातडीने मदत केली. त्यावरून भारत-द्वेषात लालचीनच आपला मित्र आहे असा निष्कर्ष पाकिस्तानने काढला. व पुढील सहा महिन्यांचे आत लाल चीनशी व्यापारी करार केला. या करारामुळे काश्मीर प्रश्नात चीनचा पाकिस्तानला पाठिंबा मिळाला व कराची, डाक्का, कॅन्टन व शांघाय या शहरांना जोडणारी विमानवाहतुक दोन्ही राष्ट्रांनी मिळून सुरू केली. डाक्क्याचा विमानतळ बांधण्याकरता अमेरिकेने देऊ केलेली ४३ लक्ष डॉलर्सची मदत स्थगित करण्यात आली. कारण लालचीनला आपण बांधलेल्या विमानतळावरून वहातुक करून देण्यास अमेरिका तयार नव्हती. परंतु ४ कोट डॉलर्सची वार्षिक मदत पाकिस्तानला मिळालीच.

## सच्चा मध्यस्थ

आयुबच्या म्हणण्याप्रमाणे त्याने सध्या चालू केलेली लाल चीनशी लगट, अमेरिकेचे आशियातील हितसंबंध धोक्यात आणणार नाही. "तुमच्याकरता आम्ही आमच्या माना अनेक वेळा संकटात घातल्या आहेत. तुम्ही आम्हाला मदत देता तेव्हा आम्ही ते करावयासच पाहिजे असे तुम्हास वाटते. परंतु आम्हालाही आमच्या संरक्षणाची काळजी घेतली पाहिजे. चीनचे व तुमचे संबंध बिघडले म्हणून तुमच्या मित्रांनीही त्यांचेशी संबंध ठेवू नयेत अशी अपेक्षा करणे चुकीचे आहे." असे आयुबखान आपल्या अमेरिकन पाहुण्यांना ऐकवण्यास कमी करीत नाही.

नेहरू गेल्यानंतर रिकामे झालेले तटस्थ राष्ट्रांच्या नेत्याचे स्थान भरून काढण्याची आयुबची महत्त्वाकांक्षा आहे. भारताविरुद्ध मदत मिळविण्याव्यतिरिक्त पेकिंग भेटीचा हाही एक महत्त्वाचा उद्देश होता. एकमेव आशियायी नेत्याचे चित्र त्याला उभे करावयाचे आहे. त्यासाठी पुढील कार्यक्रमात मॉस्को व वाशिंग्टनला भेटी देण्याचे नक्की करण्यात आले आहे.

—टाइम-न्यूयॉर्क
१२ मार्च १९६५.



अनुक्रमणिका








## संयुक्त राष्ट्रसंघातील महत्त्वाची चर्चा

ब्रिटिश परराष्ट्रीय मंत्री मिचेल स्टुअर्ट यांनी संयुक्त राष्ट्र संघाच्या शांतताप्रस्थापन करणाऱ्या लष्करास देऊ करण्यात आलेली मदत जाहीर केली आहे. या घोषणेत विशेष असे काही नसले तरी संकटकाळी दिलासा देण्याचे सामर्थ्य त्यात आहे. या घोषणेनुसार आपल्या राष्ट्रीय जबाबदाऱ्या पार पाडल्यानंतर शक्य झाल्यास ब्रिटन ६ लष्करी पलटणी संयुक्त राष्ट्र संघास देईल. यात इंजिनिअर्स, सिग्नलर्स, वहातुक, ॲम्ब्युलन्स, ऑर्डिनन्स व थोड्या झेपांची विमाने या तुकड्या असू शकतील. या पलटणी राखीव म्हणून ठेवण्याची ब्रिटनची तयारी आहे. लांब झेपीची वहातुक विमाने देण्याचा प्रयत्न पण करण्यात येईल. ब्रिटिश संरक्षणश्वेतपत्रिका जास्त खर्चाची व अण्वस्त्रांना फाजील महत्त्व देणारी आहे असे वाटणाऱ्या मजूर पक्षातील लोकांना पण या घोषणेने शांत केले आहे. ही घोषणा श्वेतपत्रिका प्रसिद्ध होण्यापूर्वीच दोन महिने होणार होती. परंतु पंतप्रधान विल्सन यांचा अमेरिकन दौरा रद्द करण्यात आला व दोन कजाग चुलत्यांच्या (अंकल सॅम व अंकल वान्या) कचाट्यात सापडलेल्या सुंदरीला सोडवण्याचे थोडेफार श्रेय अल्बानियाच्या श्री. हालिम ब्युडो यांना मिळाले.

अल्बानियाचे संयुक्त राष्ट्र संघातील कायम प्रतिनिधी श्री. ब्युडो हे प्रत्यक्षात लालचीनचेही प्रतिनिधित्व करीत आहेत. साम्राज्यवादी अमेरिका व सुधारणावादी क्रुश्चेव्हाइट रशिया राष्ट्रसंघास आपल्या भांडणातील हत्यार म्हणून वापरण्याचा प्रयत्न करीत आहेत व लहानसहान राष्ट्रांना पायदळी तुडवीत आहेत. या दोन्ही बलवान् राष्ट्रांच्या कारवायांना आपण विरोध केला पाहिजे या त्यांच्या भाषणाने अनेकांना मनातल्या मनात गुदगुल्या झाल्या व अमेरिका व रशिया या दोन्ही राष्ट्रांची झालेली कुचंबणा पाहून अनेकांना आनंद झाला. परंतु या प्रचंड राष्ट्रांच्या शेपट्या पिरगळणाऱ्या ब्युडोचे नेतृत्व स्वीकारण्यास मात्र कोणी तयार झाले नाहीत. ब्युडोच्या सूचना स्वीकारणे म्हणजे आगीतून फुफाट्यात पडण्यासारखे होते. संयुक्त राष्ट्र संघात निर्माण झालेल्या कुंठितावस्थेतून (dead-lock) निघून प्रत्यक्ष कलहाकडे (show-down) जाण्याचे सर्व राष्ट्रांनी नाकारले, व एक सप्टेंबरपर्यंत जनरल असेंब्लीची बैठक तहकूब करण्याचे ठरवले. शांतता प्रस्थापन कमिटी आपला अहवाल १५ जून रोजी सादर करणार आहे. त्या अहवालानुसार ही बैठक आधी भरवावी लागली तर ती तशी भरवावी असेही ठरविण्यात आले. या कमिटीला शांतता प्रस्थापना करता मागे केलेल्या व पुढे कराव्या लागणाऱ्या कारवायांची संपूर्ण चौकशी करण्याचा अधिकार देण्यात आलेला आहे. यामुळे सध्या तरी संयुक्त राष्ट्रसंघ एका फार मोठ्या मुष्किलीतून बाहेर पडला आहे. या सामान्य दिसणाऱ्या पण अर्थपूर्ण घटनेचे श्रेय ब्रिटिश प्रतिनिधी मंडळाला आहे.

या नव्या कमिटीमुळे संयुक्त राष्ट्र संघटनेला नवी सुरवात करता येईल की नाही याचा अंदाज करणे चुकीचे व कठीण आहे. परंतु पुढील घटना आकार घेऊ लागल्या आहेत हे निश्चित. २० फेब्रुवारीला भाषण करताना सेक्रेटरी जनरल यु थांट म्हणाले की, "एका फार महत्त्वाच्या चर्चेस सुरवात झाली आहे. शांतता प्रस्थापनाची जबाबदारी सुरक्षा मंडळात एकमत झाल्यानंतर मोठ्या राष्ट्रांनीच पत्करावी व जनरल असेम्ब्लीला फक्त वादविवाद करण्यास, चर्चा करण्यास मोकळीक असावी (द गॉल व रशिया यांचे आतापर्यंत असेच मत आहे) की या सर्वात कामाची व जबाबदारीची सारखी वाटणी व्हावी हा सर्वात महत्त्वाचा मुद्दा आहे." श्री. यु थांट लहान लहान राष्ट्रांचीच बाजू घेत होते. परंतु फक्त सुरक्षा मंडळाला शांतता प्रस्थापनाचे हक्क देण्याची कल्पना आता जुनी व टाकावू झालेली आहे असे त्यांनी स्पष्ट सांगितले.

जनरल द गॉल यांची सूचना बहुसंख्य राष्ट्रांना मान्य होण्यासारखी नाही. दुसऱ्या बाजूस जनरल असेम्ब्लीत मिळणाऱ्या मताधिक्यावर शांतता-प्रस्थापनाच्या कामगिरीची जबाबदारी अवलंबून ठेवण्यास मोठी राष्ट्रे तयार होणे अशक्य आहे. गेल्या सप्टेंबरमध्ये अमेरिकेने याबाबत एक मसूदा तयार केला होता. त्यावेळी रशियाने तो फेटाळून लावला.








तोच मसूदा चर्चेसाठी पुढे येण्याची शक्यता आहे. त्याचा मथितार्थ असा : शांतता प्रस्थापनाचे कार्य सुरक्षा मंडळाच्या अवाक्याबाहेर असेल तरच ते अंगिकारण्याचा जनरल असेम्ब्लीला हक्क असावा. हा हक्क जी राष्ट्रे संयुक्त राष्ट्र संघटनेच्या शांतता-प्रस्थापन कार्यास जास्तीत जास्त मदत करीत असतील अशा राष्ट्रांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या वीस सभा-सदांच्या कमिटीच्या सल्ल्यानुसार बजावावा. हा मसूदा म्हणजे सध्या असेम्ब्लीपुढे असलेल्या 'शांततेकरता एकत्रित येणे' याच मसुद्याचा जास्त विवेकशील पर्याय आहे. रशिया व फरान्स या दोहोंनी त्यास मान्यता न देण्यानेच संयुक्त राष्ट्र-संघात आणीबाणी निर्माण झाली आहे.

परंतु आतापर्यंत रशिया किंवा फरान्स कारवाईत अडथळा आणू शकली नाहीत. त्यांनी शब्दांच्या भडिमाराने व खर्चाची रक्कम न देण्याने संयुक्त राष्ट्रसंघास हैराण केले आहे. शांतता प्रस्थापनेचे कार्य स्वखुशीने दिलेल्या आर्थिक मदतीवर अवलंबून आहे, हे सायप्रसच्या उदाहरणाने सिद्ध झाले आहे. व नाखूष असलेल्या मोठ्या राष्ट्रांना मदत करण्यास भाग पाडणे वस्तुस्थितीस धरून होणार नाही असे अदलाय स्टिव्हन्सन यांनी कबूल केले आहे.

यापुढे निश्चित काही ठरणार की नाही हेसुद्धा सांगणे कठीणच आहे. परंतु ठरल्यास त्याची रूपरेषा साधारणपणे अशी राहील असे वाटते : मागील कारवायाकरता झालेल्या खर्चाची बाकी वसूल करण्याची जबरदस्ती होणार नाही; (देखाव्याकरता नाममात्र रक्कम देणे कदाचित जरूर वाटेल) पुढील सर्व कारवायांचा खर्च राष्ट्रांच्या खुशीवर अवलंबून राहील; व सप्टेंबरमध्ये अमेरिकेने सादर केलेल्या मसुद्याप्रमाणे जनरल असेम्ब्लीचा शांतता प्रस्थापनाचा हक्क मोठ्या राष्ट्रांनी मान्य करावा. यानंतर चर्चेस निघालेला दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे खुशीच्या मदतीसाठी एकाच किंवा जास्त श्रीमंत राष्ट्रांच्या मर्जीवर अवलंबून राहावे लागेल की काय हा आहे. कांगोचे या बाबतीतील उदाहरण ताजेच आहे. व त्यामुळे मोठ्या श्रीमंत राष्ट्रांचा हिस्सा सर्व खर्चाच्या हिश्याचा ठराविक भाग ठरवावा व मध्यम स्थितीतील राष्ट्रांनी हा बोजा जास्त प्रमाणात उचलावा. (त्यांना ते अशक्य नाही) त्यामुळे संयुक्त राष्ट्र संघाच्या कारवाया मोठ्या पाच राष्ट्रांच्या 'व्हेटो' तून मुक्त होतील.

कारण आतापर्यंतच्या सर्व कारवायातून लहानथोर सर्व राष्ट्रांना एक धडा मिळाला आहे. एखाद्या राष्ट्राने जर शांतता प्रस्थापन कार्यात मोठी मदत केली तर त्या कारवाईत मोठ्यात मोठा वाटा मिळवण्याची त्या राष्ट्राची खटपट असते निदान तसा त्या राष्ट्रावर आरोप तरी सहज करता येतो. व त्यामुळे नि:पक्षपाती कारवाईस पक्षपाती कार्याचे स्वरूप येते. हा धोका राष्ट्रसंघाने जर टाळला तर त्यातून चांगला धडा पण शिकता येईल. एखाद्या नाखुष राष्ट्राला खर्च देणे भाग पाडण्यापेक्षा व त्या कारवाईवर आपले मत प्रदर्शित करण्याऐवजी मूक राहण्यास संधि मिळाली तर जास्त चांगले होईल. कारण अशा मूक रहाण्याने कारवाई तर थांबणार नाहीच पण 'मौनं संमति लक्षणम्' म्हणून समजण्यास हरकतही रहाणार नाही. या महान चर्चेतूनही एक महत्त्वाची गोष्ट निष्पन्न होईल असे वाटते.

दि इकॉनॉमिस्ट–लंडन. २७ फेब्रुवारी १९६५.

## व्हिएटनाम-मॉस्कोपुढील शृंगापत्ती—

गेल्या गुरुवारी थोडक्या तासांच्या अवधीत मॉस्कोच्या रहिवाशांना जागतिक परिस्थितीचे थोडक्यात दर्शन घडले. लाल चिनी व व्हिएटनामी विद्यार्थ्यांनी अमेरिकन वकीलातीपुढे निदर्शने करून सोव्हिएट पोलिसांशी झालेल्या संघर्षात स्वतःची डोकी फोडून घेतली. अमेरिकन वकीलातीच्या बहुतेक सर्व खिडक्या त्यांनी फोडून टाकल्या.

अमेरिकन वकील फॉय कोहीर यांनी सोव्हिएट पोलिसांच्या शांतता राखण्याच्या धैर्यवान् प्रयत्नांची प्रशंसा केली. व आपणाला पुरेसे संरक्षण मिळाले नाही म्हणून परराष्ट्रमंत्री ग्रॅमको यांचेकडे तक्रार केली. उलट व्हिएटनामवर अमेरिकेने उघड उघड आक्रमण केले आहे असे व्याख्यान अमेरिकन वकीलास ऐकावे लागले.









अनुक्रमणिका

चिनी विद्यार्थी रस्त्यातून मुठी आवळीत आंतरराष्ट्रीय गीत गात मॉस्कोतील सुखवस्तु रहिवाशांना (क्रांतिनंतर ४७ वर्षांनी) डिवचत होते. कारण ते आपल्या लोकरी व फरच्या कपडचात श्रीमंत दिसत होते व नेमक्या घरी जाण्याच्या वेळी रस्त्यात निर्माण झालेल्या वहातुकीतील अडथळचामुळे नाखूषही दिसत होते.

मॉस्कोच्याच दुसऱ्या भागात रशियावादी १८ कम्युनिस्ट पक्षांचे सभासद चीनवादी कम्युनिस्टांना कशा प्रकारे वागवावे याबद्दल इतक्या अटीतटीने वाद घालत होते की दोन दिवसात संपणारी सभा सहा दिवस लांबवावी लागली.

## तासचे बातमीपत्र

तास पत्राने संध्याकाळी दंग्याचे वृत्त प्रसिद्ध केले. अमेरिकेने व्हिएटनामवर केलेल्या बाँबहल्ल्याविरुद्ध परकीय विद्यार्थी निदर्शने करीत आहेत. त्यात रशियन विद्यार्थ्यांचा हात नाही. एवढेच म्हटले होते. परंतु दंग्याविषयी व पोलिस व विद्यार्थी यांचेतील संघर्षाविषयी काहीही बातमी नव्हती. त्याच पत्रात चीन सरकारने केलेल्या अमेरिकेवरील आरोपांचा सारांश दिला होता. परंतु त्यातील सर्वात जोरदार प्रहार करणारी, 'व्हिएटनामी लोकांच्या रक्ताचा बदला अमेरिकेला रक्तानेच द्याला लागेल' अशा तऱ्हेची वाक्ये गाळली होती.

व्हिएटनामच्या प्रश्नावर समझोता व्हावा या कल्पनेची चीनने केलेल्या उपहासाबद्दलही हे पत्रक मूग गिळून होते. कारण त्याच रात्री मॉस्को आकाशवाणीवरून सोव्हिएट रशिया सामोपचाराने व्हिएटनामी प्रश्न मिटवावा या मताचा आहे हे जाहीर केले होते.

या सर्व धामधुमीत व अमेरिकन वकीलातीपुढील निदर्शनाच्या मध्यभागी सुखाने व समाधानाने वावरणारी एकच व्यक्ति होती व ती म्हणजे उत्तर व्हिएटनामचा पत्रप्रतिनिधि ! तो आपल्या भारी किंमतीच्या कॅमेऱ्यातून निरनिराळचा ठिकाणचे अनेक फोटो घेत होता, भांडवलशाही वृत्तपत्र प्रतिनिधींशी हस्तांदोलने करीत त्यांच्या थापा पाठीवर घेत हिंडत होता, तर साध्या कपडचातील अनेक सोव्हिएट गुप्त पोलिस भांडवलशाही प्रतिनिधी दंग्याचे फोटो घेत असताना, त्यांचे फोटो घेण्यात गुंतले होते.

## राजकीय गुंतावळा

या गुरुवारच्या तीन तासांच्या अवधीत सध्याच्या राजकीय आणीबाणीचा सर्वच चित्रपट दिसला नसला तरी त्यातील अनेक धागेदोरे जगास दिसले. व्हिएटनामबद्दल चालू असलेला अमेरिका रशिया संघर्ष, अमेरिकेबाबत व व्हिएटनामबद्दल चीन रशिया संघर्ष, जागतिक कम्युनिस्ट आंदोलनात चालू असलेला नेतृत्वाचा संघर्ष या सर्व संघर्षांचे धागेदोरे एकमेकात इतके गुंतले आहेत की एक धागा खेचला की त्याचा परिणाम सर्व गुंतावळचावर होऊन त्याचे दूरवर व अनिश्चित परिणाम होतील की काय याची भीती निर्माण झाली आहे.

मॉस्कोत वास्तव्य करणारा एकही मुत्सद्दी, अमेरिकेच्या व्हिएटनामवरील बॉम्ब हल्ल्याचा परिणाम काय होईल हे सांगण्याचे धाडस करू शकणार नाही. या हल्ल्यामुळे चीन रशिया संबंधावर काय परिणाम झाला किंवा जागतिक कम्युनिस्ट पक्षांच्या परिषदेची काय प्रक्रिया झाली किंवा व्हिएटनाममधील युद्ध खरोखरच पेटले तर रशिया काय करील हे सांगणे अशक्य आहे.

तीन आठवडचापूर्वी अमेरिकेची व्हिएटनाममधील कारवाई, चीन रशियामधील वैचारिक संघर्षातील स्फोटकता कमी करण्यास मदत करीत आहे असे वाटत होते. सोव्हिएट पंतप्रधान कोसिजीन आपल्या आशिआयी दौऱ्यावरून परत आले तेव्हा आशिआयी कम्युनिस्ट पक्षात तात्पुरता का होईना –पण समझोता झाला असून व्हिएटनाममधील साम्राज्यशाही आक्रमणास तोंड देण्यास हे सर्व पक्ष एक होतील असे वाटत होते. निदान कोसिजीनच्या भाषणावरून तरी तसे वाटत होते.

परंतु गेल्या आठवडचात पेकिंगहून या स्वप्नरंजनाचा भंग झाला. जागतिक कम्युनिस्ट पक्षाच्या परिषदेच्या सुरवातीसच पेकिंगने क्रेमलिनच्या धोरणावर जाहीर हल्ला चढविला. व त्यावरून एवढे मात्र स्पष्ट झाले की अमेरिकेच्या बॉम्ब हल्ल्याने कम्युनिस्ट यादवीयुद्धात फरक पडला नाही. पेकिंगचा हल्ला











नुसत्या वैचारिक गोष्टीवरच केन्द्रित न रहाता, रशियाच्या परराष्ट्रीय धोरणावर पण कडाडून हल्ला चढविण्यात आला.

## कोसिजीनला समज

क्रेमलिनचा उद्देश वैचारिक मतभेद बाजूला सारून व्यावहारिक गोष्टीत मतैक्य घडवून आणून धोरण ठरवावे असा होता. २६ फेब्रुवारीच्या कोसिजीनच्या टेलिव्हिजनवरील भाषणाचा तोच उद्देश होता असे वाटते. कारण रशिया चीन वाद याला ऐतिहासिक कारणे आहेत. कारण दोघांची पार्श्वभूमि वेगळी आहे व त्यामुळे कालांतराने वातावरण बदलेल, हे मतभेद नष्ट होतील असा कोसिजीनच्या भाषणाचा मथितार्थ होता परंतु चीनला अशा तऱ्हेचा कामचलावू समझोता नको आहे.

यातून पाश्चिमात्य तज्ञ निश्चित असा काहीही निष्कर्ष काढू शकत नाहीत. एका बाजूने चीन व दुसऱ्या बाजून अमेरिका सोव्हिएट रशियावर दडपण आणीत आहेत असे काहींना वाटते. चीनच्या हल्ल्याने, पेकिंग रशियाकडून वैचारिक शरणागतीचीच अपेक्षा करीत असून दुसऱ्या कशानेही त्यांचे समाधान होणार नाही हे स्पष्ट झाले आहे.

## भविष्याबद्दलची दोन भाकिते

पंतप्रधान कोसिजीन व मुख्य चिटणीस ब्रेझिनाव्ह यांना क्रुश्चेव्हच्या 'शांततामय सहजीवन' तत्त्वाची थोरवी पटली असावी असे वाटते. पेकिंगशी चांगले संबंध व पाश्चिमात्य राष्ट्रांबरोबर सहजीवन या दोन्ही गोष्टी एकदम अशक्य आहेत. वाशिंग्टन व पेकिंग या दोघांना एकाच वेळी खूष करणें अशक्य आहे हे चार महिन्यापूर्वी न पटलेले सत्य सोव्हिएट नेत्यांना आता पटू लागेल.

यामुळे सोव्हिएट नेते पुन्हा पाश्चिमात्य राष्ट्राकडे वळतील व व्हिएटनाम प्रकरणात जपूनच पाऊल टाकतील असे वाटते.

परंतु सोव्हिएट नेत्यांचे बद्दल दुसराही एक प्रवाद प्रचलित आहे. आशिया व आफ्रिका या दोन राष्ट्रांतील स्वातंत्र्याच्या चळवळी म्हणजे कम्युनिस्ट क्रांतीची दुसरी लाट आहे असा त्यांचा समज आहे. त्यामुळे सबंध कम्युनिस्ट चळवळीच्या हिताकरता या चळवळींना पाठिंबा देणे हे रशीयाचे कर्तव्य ठरते. साम्राज्यवादी शक्तींना जागतिक राजकारणात दुसऱ्यांदा जीवदान मिळाले असून सध्या त्या फार जोरात आहेत. त्याचा पाडाव करण्याकरता जगातील सर्व कम्युनिस्ट शक्तींनी एकत्र येण्याची जरूर आहे, असेही या नेत्यांना वाटते. व त्यामुळे अमेरिकेच्या व्हिएटनाम कारवाईविरुद्ध जपून वागण्याचे धोरण टिकणार नाही. चीनशी चालू असलेल्या संघर्षाचाही त्यांचेवर परिणाम होणार नाही.

–दि न्युयार्क टाइम्स.
७ मार्च १९६५.

---










# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी | ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी | ... ... ... | १०४·०० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी | ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी | ... ... ... | १८२·०० |
| (३) | धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५·०० |
| | कापडी बांधणी | ... .... ... | ५३·०० |
| (४) | मीमांसादर्शन | ... ... ... ... | ३०·०० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०·०० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... ... | ६·०० |
| (७) | बौद्धागमार्थसंग्रहः | .... ... ... | २०·०० |
| (८) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | ५·०० |
| (९) | वैदिक संस्कृतीचा विकास | ... .. ... | ६·०० |
| (१०) | नवमानवतावाद | ... ... ... ... | २·५० |
| (११) | मानवाचा आदर्श | ... ... ... ... | ३·०० |
| (१२) | चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... | ३.०० |
| (१३) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | २·५० |
| (१४) | महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) | .... | २·०० |

अनुक्रमणिका